# महाराष्ट्र विधानपरिषद

## चौथे (हिवाळी) अधिवेशन, २०१७

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

**राज्यातील गुन्हे अन्वेषण विभागातील छायाचित्रण विभाग स्वतंत्र करण्याबाबत**

**(१) ५११८ (०९-०४-२०१५). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्याच्या गुन्हे अन्वेषण विभागांतर्गत छायाचित्रण विभागातील कर्मचाऱ्यांच्या विविध समस्यांसंदर्भात नागपूर विभागाच्या लोकप्रतिनिधींनी शासनाकडे दिनांक १४ नोव्हेंबर, २०१४ रोजी वा त्यासुमारास विनंती पत्र पाठवून कर्मचाऱ्यांना न्याय देण्याची मागणी केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील गुन्हे अन्वेषण विभागांतर्गत छायाचित्रण विभागात एकूण किती कर्मचारी कार्यरत आहेत,

(३) असल्यास, या कर्मचाऱ्यांना वेतनवाढ व शैक्षणिक पात्रतेनुसार पदोन्नती देण्यात येते काय,

(४) नसल्यास, त्याची कारणे कोणती,

(५) गुन्हे अन्वेषण विभागांतर्गत असलेल्या छायाचित्रण व हस्तांतरण विभाग हा एकत्रित असल्याने तो स्वतंत्र करण्याबाबत शासनाची भूमिका काय आहे?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१३-१०-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) विविध संवर्गातर्गत एकूण - ३४ पदे मंजूर असून त्यापैकी - २० कर्मचारी कार्यरत आहेत.

(३) व (४) छायाचित्रण विभागातील कर्मचाऱ्यांना शासनाच्या प्रचलित नियमाप्रमाणे वेतनवाढ व पदोन्नती देण्यात येते.

(५) राज्यातील पोलीस घटकांकडून त्यांचेकडे दाखल गुन्हयातील दस्तऐवज हस्ताक्षर विभागाकडे परिक्षणासाठी प्राप्त झाल्यानंतर त्यांचे छायाचित्रण विभागाकडून छायाचित्रण करुन न्यायालयात साक्षीस जाताना हस्ताक्षर तज्ञास प्रती उपलब्ध करण्याचे काम हा विभाग करतो. त्यामुळे छायाचित्रण विभाग हस्ताक्षर विभागापासून वेगळा करता येणार नाही.

---

## मुंबईसह राज्यात विविध शहरात पसरणाऱ्या साथीच्या आजारांना प्रतिबंध करणेबाबत

**(२) ११६६३ (२३-१२-२०१५). श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.सुनिल तटकरे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईत १०० हून अधिक नागरिकांचा डेंगू व स्वाइनफ्ल्यु मुळे तसेच १८ नागरिकांचा लेप्टो या आजाराने मृत्यू झाला, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, महानगरपालिका व शासनाने हे मृत्यू रोखण्यासाठी आणि एकंदरच ह्या आजाराची लागण नागरिकांना होऊ नये यासाठी काय उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(३) तसेच, मुंबईसह ह्या आजारची लागण ठाणे, नागपूर, पुणे, नाशिक, रत्नागिरी इत्यादी शहरात झाली असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, सदर आजार रोखण्यासाठी तेथील रुग्णालयामध्ये काय सुसज्ज व्यवस्था निर्माण करण्यात आली आहे,

(५) ह्या आजारांचा प्रादुर्भाव स्थानिक प्रशासनांच्या निष्काळजीपणामुळे होतो का, स्थानिक प्रशासनाच्या हलगर्जीपणामुळे मृत्यूमुखी पडणाऱ्या नागरिकांच्या कुटूंबियांना शासन भरपाई देणार आहे काय ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१२-१०-२०१७) :** (१) मुंबईमध्ये जानेवारी ते डिसेंबर, २०१५ च्या दरम्यान डेंग्यु व स्वाईन फ्ल्युमुळे ६१ व लेप्टोमुळे १९ रुग्णांचा मृत्यू झाला आहे.

(२) साथीचा आजारांना प्रतिबंध करण्यासाठी बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत पुढीलप्रमाणे उपाययोजना करण्यात येतात :-

- साथीच्या आजाराचे नियंत्रण व सर्वेक्षण यासाठी साथरोग विभागात नियंत्रण कक्ष कार्यान्वित आहे.
- पुरेसे मनुष्यबळ, साधनसामुग्री व औषधसाठी इ. बाबत आढावा घेऊन त्याचे सुयोग्य नियोजन करण्यात येते.
- सर्व वैद्यकीय निम्न वैद्यकीय अधिकारी व कर्मचारी यांना पावसाळ्यापूर्वी साथीच्या आजाराबाबत प्रशिक्षण देण्यात येते.
- नियमित घर भेटीद्वारे जलजन्य, किटकजन्य तसेच इनफ्ल्युएन्झा सदृष आजाराच्या रुग्णांचा शोध घेण्यात येतो व प्रतिबंधात्मक व नियंत्रणात्मक उपचार, घ्यावयाची काळजी, धोक्याची चिन्हे व उपलब्ध सेवासुविधा याबाबत जनजागृती करण्यात येते.
- पिण्याच्या पाण्याचे दैनंदिन सर्वेक्षण करण्यात येते व दुषित पाणी आढळलेल्या विभागात जनजागृती, क्लोरीन गोळ्यांचे वाटप व बाधित रुग्णांना औषधोपचार करण्यात येतात. तसेच, फेरीवाल्यांकडील पाण्याचे नमुने तपासून दुषित पाणी आढळलेल्या फेरीवाल्यांवर कारवाई करण्यात येते.
- डासोत्पत्ती रोखण्यासाठी विभागवार उपाययोजना करण्यात येतात.
- लेप्टोस्पायरेसिसवर नियंत्रण मिळवण्यासाठी व भविष्यकाळात उद्रेक होऊ नये यासाठी एकात्मिक उपाययोजना तयार करण्यात आली आहे.

(३) हे खरे आहे, तथापि, नागपूर शहरात लेप्टोस्पायरेसिसचा एकही रुग्ण आढळून आला नाही.

(४) मुंबईत साथीचा प्रादुर्भाव झालेल्या रुग्णांच्या उपचारांसाठी सर्व रुग्णालयांमध्ये उपलब्ध एकूण खाटांपैकी ३० ते ४० % खाटा राखीव ठेवण्यात आल्या आहेत. तसेच कस्तुरबा रुग्णालय हे साथीच्या रोगांचे ५१५ खाटांचे रुग्णालय आहे.

ठाणे येथील छत्रपती शिवाजी महाराज रुग्णालय येथे १० खाटांचे Isolation ward स्वाईन फ्ल्यु रुग्णांसाठी कार्यान्वित करण्यात आले आहे.

नागपूर शहरातील ३५ खाजगी दवाखान्यांत स्वाईन फ्ल्यु च्या उपचाराकरिता मान्यता देण्यात आली असून, डेंग्यु व स्वाईन फ्ल्यु या आजारांच्या रोगनिदान व उपचारासाठी महानगरपालिकेच्या विविध रुग्णालयांमध्ये स्क्रिनींग सेंटर तथा औषधोपचाराची व्यवस्था करण्यात आली आहे.

स्वाईन फ्ल्युबाबत नागरिकांना माहितीसाठी पुणे महानगरपालिकेच्या डॉ.नायडू रुग्णालयात ०२०-२५५०६३१७ ही हेल्पलाईन सुरु करण्यात आली आहे.

नाशिक महानगरपालिकेमार्फत स्वाईन फ्ल्यु रुग्णांवर उपचारासाठी स्वतंत्र कक्ष स्थापन करण्यात आला असून, सदर रुग्णालयांमध्ये पुरेसा औषधसाठा उपलब्ध आहे.

(५) सदर आजारांचा प्रादुर्भाव स्थानिक प्रशासनाच्या निष्काळजीपणामुळे होत नसून, महानगरपालिकांमार्फत सदर रुग्णांची तात्काळ तपासणी करुन त्यांचेवर औषधोपचार व प्रतिबंधात्मक कार्यवाही करण्यात येते.

---

## राज्यातील गुन्हे अन्वेषण विभागातील छायाचित्रण विभागातील कर्मचाऱ्यांना वेतनवाढ व शैक्षणिक पात्रता वाढ करण्याबाबत

**(३) १४३८९ (२३-१२-२०१५). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले : तारांकित प्रश्न क्रमांक २७७१ ला दिनांक ११ मार्च, २०१५ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील गुन्हे अन्वेषण विभागातील छायाचित्रण विभागातील कर्मचाऱ्यांना वेतनवाढ, शैक्षणिक पात्रता वाढ करणे, पदोन्नती देण्याबाबत तसेच पदाचे नामाभिदानात बदल करुन छायाचित्रण विभाग स्वतंत्र करण्याची मागणी नागपूर विभागाचे लोकप्रतिनिधी यांनी शासनाकडे सन २०१४ पासून अनेकवेळा विनंती पत्र पाठवून केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, वेतनसमिती शासन निर्णय क्र. १२०९ प्र.क्र.२७/सेवा-९, दिनांक २१/०५/२००९ नुसार विभागाच्या कामानुसार वेतनामध्ये असलेली तफावतीसंबंधी प्रस्ताव पाठविण्याबाबत शासनाने कळविले होते, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, अप्पर पोलीस महासंचालक यांनी गुन्हे अन्वेषण विभाग, पुणे यांनी दिनांक २१/०७/२००९ रोजी छायाचित्रण विभाग वगळून फक्त हस्ताक्षर विभागाचा प्रस्ताव पाठविला व त्यामुळे हस्ताक्षर विभागातील पदांची वेतनवाढ झाली आणि छायाचित्रण विभागातील कर्मचारी वेतन वाढीपासून वंचित राहिले, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, हस्ताक्षर विभाग व छायाचित्रण विभाग एकाच अधिपत्याखाली असतांना छायाचित्रण विभागातील कर्मचाऱ्यांना वेतनश्रेणी वाढीचा प्रस्ताव न पाठविण्याची कारणे काय आहेत,

(५) छायाचित्रण विभागातील कर्मचाऱ्यांची शैक्षणिक पात्रता वाढीबाबत दिनांक १७ ऑगस्ट, १९८९ पासूनची मागणी व दिनांक २६ फेब्रुवारी, २०१३ रोजी सुधारित सेवा प्रवेश नियमांची माहिती पोलीस महासंचालकांच्या मार्फत गुन्हे अन्वेषण विभागाने राज्याचे मुख्य सचिव यांना पाठविली असतानाही त्यावर कोणतीही कार्यवाही करण्यात आली नाही, हे ही खरे आहे काय,

(६) छायाचित्रण विभागात कनिष्ठ तांत्रिक सहाय्यक, वरिष्ठ तांत्रिक सहाय्यक, सहाय्यक छायाचित्रकार, छायाचित्रकार, कार्यदेशक अशी पदोन्नतीने पदरचना असून कर्तव्य व जबाबदाऱ्या भिन्न असतांनासुध्दा या पदावर काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांना एकाच वेतनश्रेणीमध्ये काम करावे लागते. पदोन्नतीनुसार वेतनश्रेणी वाढ करण्यात येत नाही हे ही खरे आहे काय, असल्यास त्याची कारणे काय आहेत,

(७) असल्यास, उक्त प्रकरणी चौकशी करून शासनाने काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे तसेच छायाचित्रण विभाग स्वतंत्र करण्याबाबत शासनाची भूमिका काय आहे ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१३-१०-२०१७) :** (१), (२) व (३) होय, हे खरे आहे.

(४) सदरचा प्रस्ताव सन २००९ मध्ये सादर करण्यात आला असल्याने याबाबतची सर्व कागदपत्रे सन २०१२ मध्ये मंत्रालयास लागलेल्या आगीत नष्ट झालेने याबाबतची कारणमीमांसा सद्य:स्थितीत देता येत नाही. तथापि छायाचित्रण विभागातील कर्मचाऱ्यांच्या वेतनवाढीच्या प्रस्तावास वित्त विभागाची सहमती प्राप्त न झाल्याने त्यावर अद्याप अंतिम निर्णय झाला नाही.

(५) छायाचित्रण विभागातील कर्मचाऱ्यांचे सुधारित सेवाप्रवेश नियम तयार करण्याची कार्यवाही सामान्य प्रशासन विभागाच्या मान्यतेने शासन स्तरावर सुरु आहे. त्यामध्ये शैक्षणिक पात्रतेमध्ये वाढ करण्याची बाबही अंतर्भूत करण्यात आली आहे.

(६) व (७) छायाचित्रण विभागातील अधिकारी/कर्मचारी यांची प्रचलित शासन नियमानुसार पदोन्नती व वेतनवाढ करण्यात येते.

सदर कर्मचाऱ्यांच्या वेतन सुधारणेच्या प्रस्तावास वित्त विभागाची सहमती प्राप्त न झाल्याने त्यावर अद्याप अंतिम निर्णय झालेला नाही. तथापि, आता वित्त विभागाने दिनांक १४/०८/२०१७ च्या शासन निर्णयान्वये एखाद्या विभागातील संवर्गाच्या ६ व्या वेतन आयोगातील सुधारित वेतन संरचनेत त्रुटी राहिली असल्यास सदर त्रुटींचे परिक्षण करुन सुधारित वेतन श्रेणीची शिफारस करण्याची बाब राज्य वेतन सुधारणा समिती-२०१७ च्या कार्यकक्षेत अंतर्भूत केली आहे. यापुढे ६ व्या वेतन आयोगाच्या वेतनसंरचनेतील त्रुटीसंबंधीचे कोणतेही प्रस्ताव विचारार्थ घेऊ नये याबाबत निर्देशीत केलेले आहे. त्यानुसार विभागामार्फत आवश्यक ती कार्यवाही करण्यात येईल.

तसेच राज्यातील पोलीस घटकांकडून त्यांचेकडे दाखल गुन्हयातील दस्तऐवज हस्ताक्षर विभागाकडे परिक्षणासाठी प्राप्त झाल्यानंतर त्यांचे छायाचित्रण विभागाकडून छायाचित्रण करुन न्यायालयात साक्षीस जाताना हस्ताक्षर तज्ञास प्रती उपलब्ध करण्याचे काम हा विभाग करतो. त्यामुळे छायाचित्रण विभाग हस्ताक्षर विभागापासून वेगळा करता येणार नाही.

---

## राज्यातील गुन्हे अन्वेषण विभागातील छायाचित्रण विभागाच्या विविध मागण्यांबाबत

**(४) १५२०१ (२९-०४-२०१६). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वेतनसमिती शासन निर्णय क्र. १२०९ प्र.क्र. २७/सेवा-९, दिनांक २१/०५/२००९ नुसार विभागाच्या कामानुसार वेतनामध्ये असलेली तफावतसंबंधी प्रस्ताव पाठविण्याबाबत शासनाने कळविले होते, परंतु या पत्रानुसार अप्पर पोलीस महासंचालक यांनी गु.अ.वि. महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दिनांक २१/०७/२००९ रोजी छायाचित्रण विभाग वगळून हस्ताक्षर विभागाचा प्रस्ताव पाठविला व त्यामुळे हस्ताक्षर विभागातील पदांची वेतनवाढ झाली आणि छायाचित्रण विभागातील कर्मचारी वेतन वाढीपासून वंचित राहिले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, दिनांक २ नोव्हेंबर, २०१२ रोजी अप्पर मुख्य सचिव, गृह विभाग यांना व अप्पर पोलीस महासंचालक, राज्य गुन्हे अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पाठविलेल्या पत्राची तसेच अप्पर मुख्य सचिवांना पोलीस महासंचालक यांनी उपरोक्त दोन्ही विभागाच्या वेतनश्रेणी वाढीचा संयुक्त प्रस्ताव पाठविलेला असताना फक्त हस्ताक्षर विभागाच्या वेतनश्रेणी वाढीचा प्रस्ताव पाठविण्यात आला तसेच हस्ताक्षर विभाग व छायाचित्रण विभाग एकच असताना छायाचित्रण विभागातील कर्मचाऱ्यांचा वेतनश्रेणी वाढीचा प्रस्ताव न पाठविण्याची कारणे काय आहेत,

(३) दिनांक १५ फेब्रुवारी, २०१३ रोजी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना हस्ताक्षर व छायाचित्रण विभागाच्या वेतनश्रेणी सुधारण्याबाबतचा तसेच छायाचित्रण विभागाच्या वेतनश्रेणी वाढीचा प्रस्ताव वेतन त्रुटी समितीपुढे हस्ताक्षर विभागाने न पाठविल्याबाबतचे पत्र व त्याची माहितीस्तव प्रत मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय मुंबई यांना विशेष पोलीस महानिरीक्षक, राज्य गुन्हे अन्वेषण विभाग, पुणे यांनी पत्र पाठवून सुध्दा छायाचित्रण विभागावर झालेल्या अन्यायाचे निराकरण झाले नाही तसेच वरील सदर उल्लेखित पत्राच्या अनुषंगाने हस्ताक्षर व छायाचित्रण विभाग एक

असताना फक्त हस्ताक्षर तज्ज्ञांना सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्याबाबतच्या दिनांक ०८/०४/२०१५ रोजी अप्पर मुख्य सचिव, गृह विभाग यांनी बोलविलेल्या सचिवांच्या बैठकीलाअप्पर पोलीस महासंचालक, राज्य गुन्हे अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी छायाचित्रण विभागावर यापुर्वीही अन्याय झालेला असून छायाचित्रण विभागाला त्यांनी पाठविलेल्या दिनांक १५/०२/२०१३ रोजीच्या पत्रानुसार वेतनश्रेणी वाढवून मिळावी अशी शिफारस केली, यावर शासनाने काय कार्यवाही केली आहे काय,

(४) असल्यास, छायाचित्रण विभागातील कर्मचाऱ्यांची शैक्षणिक पात्रता वाढीबाबत दिनांक १७ ऑगस्ट, १९८९ पासूनची मागणी व दिनांक २६ फेब्रुवारी, २०१३ रोजी सुधारीत सेवा प्रवेश नियमाची माहिती पोलीस महासंचालकांच्या मार्फत गुन्हे अन्वेषण विभागाने राज्याचे मुख्य सचिव यांना पाठविली असतानाही त्यावर कोणतीही कार्यवाही करण्यात आली नाही, तसेच छायाचित्रण विभागात १) कनिष्ठ तांत्रिक सहाय्यक, २) वरिष्ठ तांत्रिक सहाय्यक, ३) सहाय्यक छायाचित्रकार, ४) छायाचित्रकार, ५) कार्यदेशक अशी पदोन्नतीने पदरचना असून कर्तव्य व जबाबदाऱ्या भिन्न असतानासुध्दा या पदावर काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांना एकाच वेतनश्रेणीमध्ये म्हणजेच ५२००-२०२०० अशी एकसारखीच आहे, त्यात कालावधीनुसार वेतनश्रेणीमध्ये बदल होणे व ही सर्व पदे तांत्रिक स्वरुपाची असूनसूध्दा एकसारखीच आहे, त्यात कालावधीनुसार वेतनश्रेणीमध्ये बदल होणे व ही सर्व पदे तांत्रिक स्वरुपाची असूनसुध्दा एकसारखीच आहे, त्यात कालावधीनुसार वेतनश्रेणीमध्ये बदल होणे व ही सर्व पदे तांत्रिक स्वरुपाची असुनसुध्दा त्यांना तांत्रिक स्वरुपाची वेतनश्रेणी का मिळालेली नाही, एकच वेतनश्रेणी असल्याने त्यांना १२ वर्षानंतर मिळणाऱ्या कालबध्द पदोन्नतीचा (आश्वासित प्रगती योजना) कोणत्याही प्रकारचा लाभ एकाही पदाला मिळत नाही, त्यामुळे कनिष्ठ तांत्रिक सहाय्यक व वरिष्ठ तांत्रिक सहाय्यक यांना त्यांचेवरील पदामध्ये विलीन करण्यात यावे, यानुसार पदांची रचना व वेतनश्रेणी असावी यावर वरिष्ठांनी का लक्ष घातले नाही, हे ही खरे आहे काय,

(५) भारतात सर्व राज्यात छायाचित्रण विभाग हा स्वतंत्र असताना फक्त महाराष्ट्रात ज्यांना छायाचित्रणाची अजिबात माहिती नसलेल्या हस्ताक्षर विभागाच्या अधिपत्याखाली हा विभाग असल्याने छायाचित्रण विभागाची शैक्षणिक पात्रता वाढ, वेतनश्रेणी वाढ, सेवाप्रवेश नियम यात आजपावेतो काहीच बदल हस्ताक्षर विभागाने केला नाही, छायाचित्रण विभागातील ९० टक्के कर्मचारी पदवीधर व छायाचित्रणाचा डिप्लोमा असतानाही त्यांना १० वी चे शैक्षणिक नियम लावून छायाचित्रण विभाग हा हस्ताक्षर विभागापासून वेगळा का केला नाही, या प्रकरणी तात्काळ दखल घेऊन त्यांच्यावरील अन्याय दूर करणार आहे काय, तसेच छायाचित्रण विभाग स्वतंत्र करण्याबाबत शासनाची भूमिका काय आहे ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (०९-१०-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) व (३) राज्य गुन्हे अन्वेषण विभागांतर्गत कार्यरत हस्ताक्षर व छायाचित्रण या दोन्ही विभागाचे अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन सुधारणेबाबतचे प्रस्ताव अपर मुख्य सचिव (गृह) यांचे अध्यक्षतेखाली दिनांक ८/०४/२०१५ रोजीच्या बैठकीत ठरल्याप्रमाणे स्वतंत्रपणे वित्त विभागास सादर करण्यात आले होते. तथापि सदर प्रस्तावास वित्त विभागाची सहमती प्राप्त न झाल्याने त्यावर अद्याप अंतिम निर्णय झालेला नाही.

(४) व (५) सदर मुद्यांबाबतची माहिती खालील प्रमाणे आहे.

i) सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने सेवा प्रवेश नियम तयार करण्याची कार्यवाही विभागस्तरावर करण्यात येत आहे.

ii) छायाचित्रण विभागातील कर्मचाऱ्यांच्या वेतन सुधारणेच्या प्रस्तावावर वित्त विभागाची सहमती न झालेने अद्याप अंतिम निर्णय झालेले नाही. तथापि,आता वित्त विभागाने दिनांक १४/०८/२०१७ च्या शासन निर्णयान्वये एखाद्या विभागातील संवर्गाच्या ६ व्या वेतन आयोगातील सुधारित वेतन संरचनेत त्रुटी राहिली असल्यास सदर त्रुटींचे परिक्षण करून सुधारित वेतन श्रेणीची शिफारस करण्याची बाब राज्य वेतन सुधारणा समिती-२०१७ च्या कार्यकक्षेत अंतर्भूत केली आहे. यापुढे ६ व्या वेतन आयोगाच्या वेतनसंरचनेतील त्रुटीसंबंधीचे कोणतेही प्रस्ताव विचारार्थ घेऊ नये याबाबत निर्देशीत केलेले आहे. त्यानुसार

विभागामार्फत आवश्यक ती कार्यवाही करण्यात येईल.

iii) तसेच राज्यातील पोलीस घटकांकडून त्यांचेकडे दाखल गुन्हयातील दस्तऐवज हस्ताक्षर विभागाकडे परिक्षणासाठी प्राप्त झाल्यानंतर त्यांचे छायाचित्रण विभागाकडून छायाचित्रण करुन न्यायालयात साक्षीस जाताना हस्ताक्षर तज्ञास प्रति उपलब्ध करण्याचे काम हा विभाग करतो. त्यामुळे छायाचित्रण विभाग हस्ताक्षर विभागापासून वेगळा करता येणार नाही.

---

## राज्यातील मराठी भाषीक रिक्षाचालकांना परवाने देण्याच्या निर्णयाबाबत

**(५) २०३०९ (१६-०८-२०१७). श्री.संजय दत्त, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.शरद रणपिसे, श्री.रामहरी रुपनवर, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक १३२८४ ला दिनांक १८ डिसेंबर, २०१५ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) रिक्षा परवाने मिळविण्यासाठी चालकाला मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक असल्याचा आदेश मा.परिवहन मंत्री यांनी काढला असल्याचे माहे एप्रिल, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास मराठी लिहिता-वाचता येणाऱ्या चालकास रिक्षा परवाने देण्याबाबत शासनाच्या परिवहन विभागाने दिनांक २३ ऑक्टोबर, २०१५ रोजी अध्यादेश काढून मराठी भाषेचे ज्ञान असणाऱ्या चालकास रिक्षा परवाना देण्यात येईल असे आदेश दिले होते, या आदेशामुळे भाषेच्या नावावर परवाने देतांना भेदभाव होण्याची शक्यला लक्षात घेता या परिपत्राकासंदर्भात सुधारणा करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. दिवाकर रावते (३१-१०-२०१७) :** (१), (२) व (३) माहे डिसेंबर-२०१५ मध्ये ऑटोरिक्षा परवान्यांचे फेरवाटप करताना परिवहन आयुक्त कार्यालयाच्या स्तरावर दिनांक २०/०२/२०१६ व दिनांक २४/०२/२०१६ च्या परिपत्रकान्वये

मराठी भाषेची अट घालण्यात आलेली होती. दरम्यान ॲटोरिक्षा परवान्यासंदर्भात दिनांक १७/०६/२०१७ च्या अधिसूचनेन्वये जाहीर केलेल्या धोरणांच्या अनुषंगाने परवान्याच्या अटी व शर्ती दिनांक १८/०७/२०१७ च्या शासन निर्णयान्वये विहित केल्या असून यामध्ये मराठी भाषेच्या अटीचा समावेश नाही.

---

**वडाळा (पूर्व), मुंबई येथील बीपीटी वसाहतीतील पथदिवे बंद असल्याबाबत**

**(६) २०८९६ (२३-०८-२०१६). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.संजय दत्त, श्री.शरद रणपिसे, श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वडाळा (पूर्व), मुंबई येथील बीपीटी वसाहतीत ठिकठिकाणचे पथदिवे वर्षभरापासून बंद असल्याने रात्री नागरिकांची गैरसोय होत असल्याचे माहे एप्रिल, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त ठिकाणी पथदिव्यांच्या अभावी अंधार पडत असल्याने चोरी आणि सोनसाखळी चोऱ्यांचे प्रमाण वाढल्याने नागरिकांमध्ये भीतीचे वातावरण पसरले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त ठिकाणी पथदिव्यांची दुरुस्ती करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१२-१०-२०१७) :** (१), (२), (३) व (४) मुंबई पोर्ट ट्रस्ट हे केंद्र शासनाच्या अखत्यारीत येते.

वडाळा (पूर्व), मुंबई येथील मुंबई पोर्ट ट्रस्ट वसाहतींमधील रस्त्यांची बांधणी व देखभाल ही मुंबई पोर्ट ट्रस्टमार्फत करण्यात येत असून, सदर वसाहतींमधील अंतर्गत रस्त्यावरील पदपथ दिव्यांची बाधंणी मुंबई पोर्ट ट्रस्टमार्फत करण्यात आलेली आहे.

सदर पदपथ दिव्यांचे देखभाल व परिरक्षण तसेच, विद्युत देयकांचे अधिदान सुध्दा मुंबई पोर्ट ट्रस्टमार्फत केले जाते.

---

**कोल्हापूर येथील पर्ल्स या कंपनीत फसवणूक झालेल्या गुंतवणूकदारांची रक्कम परत मिळवून देण्याबाबत**

**(७) २६६०६ (०४-०१-२०१७). श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक १७८२३ ला दिनांक २३ मार्च, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कोल्हापूर येथील पर्ल्समधील फसवणूक लक्षात घेवून सेबीने पावणेदोन वर्षापूर्वी देवघेवीचे व्यवहार बंद केले असल्यामुळे जिल्ह्यातील अंदाजे ५५ हजार गुंतवणूकदारांकडे दुर्लक्ष केले असल्याचे माहे सप्टेंबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन जिल्ह्यातील गुंतवणूकदारांचे सुमारे ६०० कोटी रुपये कंपनीची मालमत्ता ताब्यात घेवून गुंतवणूकदारांची रक्कम देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२४-१०-२०१७) :** (१) व (२) पर्ल्स कंपनीविरुध्द राज्यातील पुणे, अमरावती, सातारा, बीड, गोंदिया व लोहमार्ग पुणे या ठिकाणी गुन्हे दाखल आहेत. तसेच, कोल्हापूर जिल्ह्यातील पर्ल्स कंपनीविरुध्द दाखल १ गुन्हा मा.उच्च न्यायालयाने रद्दबाबत केला आहे.

पर्ल्स कंपनीने केलेल्या फसवणूकीसंदर्भात मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल झालेल्या सिव्हील अपील क्र. १३३०१/२०१५ मध्ये मा.सर्वोच्च न्यायालयाने पर्ल्स कंपनीची मालमत्ता ताब्यात घेऊन त्याची विक्री करावी व त्यातून मिळणारी रक्कम गुंतवणूकदारांना परत करावी, याकरिता श्री. आर. एम. लोढा, माजी सरन्यायाधिश यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्याचे सेबीला निर्देश दिले आहेत. यासंदर्भातील कार्यवाही सेबीकडून अपेक्षित आहे.

(३) विलंब झालेला नाही.

---

## राज्यातील रमाई घरकूल योजनेच्या उद्दिष्टपूर्तीबाबत

**(८) २७००४ (१२-०४-२०१७). श्री.धनंजय मुंडे, श्री.अमरसिंह पंडित, ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात रमाई घरकूल योजना उद्दिष्टानुसार पुर्ण होत नसल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त योजनेंतर्गत प्रतीवर्षी किती घरकुलांचे उद्दिष्ट पुर्ण करण्यात येते तसेच सन २०१५ ते २०१७ या कालावधीत उद्दिष्टापैकी पूर्ण केलेल्या घरकुलांची संख्या किती आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. राजकुमार बडोले (२५-१०-२०१७) :** (१) हे अंशत: खरे आहे.

(२) रमाई आवास योजनेंतर्गत ग्रामीण व शहरी क्षेत्रात सन २०१०-११ ते जून, २०१७ अखेर पर्यंत एकूण ४,८०,५८८ उद्दिष्टांपैकी ३,३१,७६२ घरकुले, घरकुल निर्माण समितीने मंजूर केलेली आहेत. त्यापैकी २,२०,८८४ एवढी घरकुले पूर्ण झालेली आहेत व ७३,६५३ इतके घरकुले प्रगतीपथावर असून, उर्वरित घरकुलांचे बांधकाम सुरु झालेले नाही.

(३) योजनेचे उद्दिष्ट साध्य न होण्याची सर्वसाधारण कारणे खालीलप्रमाणे आहेत :-

१. लाभार्थ्यांकडे स्वत:ची जागा नसणे किंवा लाभार्थी हे अतिक्रमण केलेल्या जागेवर राहात असणे.
२. लाभार्थ्यांकडे शासनाने निर्धारित केलेल्या चटई क्षेत्रापेक्षा कमी चटईक्षेत्र असणे.
३. जागेच्या किंमतीत मोठया प्रमाणात वाढ झाल्यामुळे रमाई आवास योजनेंतर्गत लाभ घेऊ इच्छिणाऱ्या लाभार्थ्यांस परवडणाऱ्या किंमतीत भूखंड उपलब्ध न होणे.
४. एकत्र कुटुंबामध्ये काही ठिकाणी जागेबाबत सुस्पष्टता नसणे.
५. बऱ्याच लाभार्थ्यांकडे दिनांक ०१/०१/१९९५ पूर्वीपासून रहात असल्याबाबतचा रहिवासी पुरावा उपलब्ध नसणे.

६. योजनेतील बरेच लाभार्थी हे दारिद्रय रेषेखालील असल्याने बांधकाम अनुदानाव्यतिरिक्त जो जास्तीचा खर्च लागतो तो खर्च करण्यास सक्षम नसणे.
७. बांधकामाचे साहित्य व मजूरीत झालेली वाढ इत्यादि.

---

## राज्यातील कारागृहांमधील कैद्यांना मुलभूत सुविधा पुरविणेबाबत

**(९) २७१६४ (१३-०४-२०१७). श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील, ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील कारागृहांमध्ये अस्वच्छता असणे, कैद्यांना योग्य प्रकारची झोपण्याची व्यवस्था नसणे, पोषणमूल्य नसलेले व अपुरे अन्न मिळत असणे तसेच त्यांच्या आरोग्याची हेळसांड होत असल्याचे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, त्यामुळे कारागृहांचा शास्त्रीय पध्दतीने अभ्यास करा असा आदेश मा.मुंबई उच्च न्यायालयाने शासनाला दिला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, मा.उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार शासनाने सदर अभ्यास करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१३-१०-२०१७) :** (१) क्षमतेपेक्षा जास्त बंदी दाखल असल्याने सोईसुविधांवर ताण पडत असला तरी नियमानुसार देय सुविधा, आहार तसेच वैद्यकीय उपचार बंद्यांना पुरविण्यात येत आहेत.
(२) होय.
(३) मा.उच्च न्यायालयाकडील पी.आय.एल. क्र. १६७/२०१५ सह ४६/२०१५ च्या अनुषंगाने राज्यात अद्ययावत कारागृह तयार करण्याच्या अनुषंगाने अभ्यास व त्यावरील उपाययोजना सुचविण्यासाठी डॉ.एस. राधाकृष्णन (मा.उच्च न्यायालयाचे सेवानिवृत्त न्यायाधीश) यांचे अध्यक्षतेखाली समिती गठीत केली असून, सहा महिन्याच्या आत शासनास शिफारशी सादर करण्याचे निर्देश दिले आहेत.

तसेच, शासन निर्णय दिनांक १९/०६/२०१७ अन्वये राज्यातील कैद्यांना पुरविण्यात येणाऱ्या आहार व स्वच्छतेबाबत तपासणी करणेकरीता जिल्हा स्तरावर समितीची स्थापना केली आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**कांदिवली (मुंबई) येथील शासकीय मालकीचा १० एकरचा मोकळा भूखंड मे रुचिप्रिया डेव्हलपर्सला दिल्याबाबत**

**(१०) २७७२६ (१३-०४-२०१७). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.धनंजय मुंडे, ॲड.निरंजन डावखरे, श्री.नरेंद्र पाटील, श्री.अमरसिंह पंडित, ॲड.जयदेव गायकवाड : दिनांक ९ डिसेंबर, २०१६ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक ६ मधील प्रश्न क्रमांक १९६१५ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा यांनी कांदिवली (मुंबई) येथील शासनाच्या मालकीचा १० एकर मोकळा भूखंड मे.रुचिप्रिया डेव्हलपर्स कडून बांधकामासहित ताब्यात घेण्याचा आदेश दिनांक २५ एप्रिल, २०१६ व दिनांक २९ जून, २०१६ रोजी पारित करून कार्यवाही सुरु केल्याचा अहवाल जिल्हाधिकारी यांनी दिला आहे, हे खरे आहे काय,
(२) तसेच, सदर झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाने उक्त १० एकराचा मोकळा भूखंड मे. रुचिप्रिया डेव्हलपर्सला देण्याच्या कृत्याची चौकशी करण्यात आलेली नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले, तद्नुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (२६-१०-२०१७) :** (१), (२) व (३) प्रस्तुत प्रकरणी जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांचेकडून चौकशी करण्यात आलेली आहे. याबाबत जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांनी दिनांक २५/०४/२०१६ रोजी मौजे कांदिवली (मुंबई) येथील शासनाच्या मालकचा १० एकर मोकळा भूखंड मे. रूचिप्रिया डेव्हलपर्स कडून त्यावरील बांधकामासह शासनाच्या ताब्यात घेण्याबाबत आदेश पारित केले आहेत. सदर आदेशाचे पुनर्विलोकन करण्याची विनंती जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांनी दिनांक २९/०६/२०१६ रोजीच्या पत्रान्वये अमान्य केली आहे.

मे. रुचिप्रिया डेव्हलपर्स यांनी जिल्हाधिकारी यांच्या दिनांक २५/४/२०१६ च्या आदेशाविरूध्द महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ च्या कलम २४७ अन्वये अपर आयुक्त, कोकण विभाग यांचेकडे अपील दाखल केले होते. तथापि, अपर आयुक्त, कोकण विभाग यांच्या दिनांक ३१/०३/२०१७ च्या आदेशान्वये मे. रुचिप्रिया डेवल्हपर्स यांचा अर्ज विना कार्यवाही काढून टाकला आहे.

रुचीप्रिया डेव्हलपर्स यांनी सदर आदेशाने व्यथित होऊन मा.मुंबई उच्च न्यायालयात रिट पिटीशन क्र. १२५३/२०१७ दाखल केले असून मा.न्यायालयाने दिनांक ४/५/२०१७ च्या आदेशान्वये प्रकरणी स्थगिती दिली आहे. सदर प्रकरण सद्या न्यायप्रविस्ट आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**नागपूर येथील मिहान प्रकल्पाबाबत**

**(११) २७९९३ (१३-०४-२०१७). श्री.जयवंतराव जाधव : दिनांक १६ डिसेंबर, २०१६ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक ७ मधील प्रश्न क्रमांक १९३५० ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मिहानच्या मूळ प्रकल्प अहवालातील प्रस्तावामध्ये ५० टक्के कपात करण्यात आल्याची बाब निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मिहान प्रकल्प पूर्ण करण्याची कालमर्यादा सन २०३० वरून सन २०४५ करण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रश्न भाग (१) व (२) मधील निर्णयांना मंत्रिमंडळाची मान्यता घेण्यात आलेली नाही, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, मूळ प्रकल्प अहवालानुसार मिहान प्रकल्प साकारण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (०१-११-२०१७) :** (१) मिहान प्रकल्पाच्या निर्धारित क्षेत्रात कोणताही बदल करण्यात आलेला नाही.

सन २०००-२००१ मध्ये एल ॲण्ड टी रॅम्बॉल यांनी तयार केलेला अहवाल त्यावेळेच्या विमान वाहतुकीबाबत असलेल्या परिस्थितीनुरुप तयार केला होता. त्यानंतर हवाई प्रवासी वाहतूक क्षेत्रात झालेले बदल विचारात घेऊन भारतीय विमानपत्तन प्राधिकरण यांच्या मार्गदर्शनाखाली हवाई वाहतूक प्रक्षेकपणाबाबत पुनर्रचना करण्यात आली. त्यानुसार विमानतळावरुन हाताळण्यात येणाऱ्या प्रवासी संख्येच्या प्रमाणात अंदाजे ५० टक्के घट करण्यात आली आहे.
(२) होय, हे खरे आहे.
(३) सद्य:स्थितीत आवश्यकता नाही.
(४) मिहान प्रकल्प साकारण्यासाठी विशेष स्तरावर प्रयत्न सुरु आहेत.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील कनिष्ठ विनाअनुदानित महाविद्यालयांना २० टक्के अनुदान देण्याबाबत

**(१२) २८२२९ (१२-०४-२०१७). श्री.हरिसिंग राठोड :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील माध्यमिक शाळांना दिल्या जात असलेल्या २० टक्के अनुदानाप्रमाणेच कनिष्ठ विनाअनुदानित महाविद्यालयांना सुध्दा अनुदान दिले जाईल असे आश्वासन मा.शालेय शिक्षण मंत्री यांनी शेगांव येथील राज्यस्तरीय अधिवेशनात दिले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मा.मंत्री महोदयांनी या बाबतीत लवकरच शाळास्तर आणि इतर अधिकाऱ्यांच्या भेटी घेवून हा प्रश्न सोडविण्याचे आश्वासन दिले होते, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, दिलेल्या आश्वासनाची अंबलबजावणी करुन विनाअनुदानित कनिष्ठ महाविद्यालयास २० टक्के अनुदान देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत तसेच याबाबतीत शासनाचे धोरण काय आहे ?

**श्री. विनोद तावडे (३१-१०-२०१७) :** (१) व (२) होय.
(३) उच्च माध्यमिक शाळांच्या मूल्यांकनाबाबतच्या प्रस्तावांवर क्षेत्रिय स्तरावर कार्यवाही सुरु आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**राज्यात विशेषत: ग्रामीण भागात नोटरी परवानाधारक जादा फी आकारात असल्याबाबत**

**(१३) २९१३० (१३-०४-२०१७). श्रीमती हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात विशेषत: ग्रामीण भागात नोटरी करणेसाठी ३००, ५०० व १००० रुपये इतकी फी नोटरी परवानाधारकांकडून आकारली जाते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, नोटरी परवानाधारक वकिलांमार्फत सदरच्या आकारणीची पावती ही फक्त ३० ते ४० रुपये इतकीच दिली जाते, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, याबाबत शासनाने निश्चित अशी फी आकारणी केलेली असताना सुध्दा नोटरी परवानाधारक याची अंमलबजावणी करीत नसून त्यांच्या मर्जीने पैसे आकारत असून जनतेची आर्थिक लूट करीत असल्याने याबाबत नियम करुन संबंधित नोटरी परवानाधारक यांच्या कार्यालयात दर फलक लावण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२९-०६-२०१७)** : (१) महाराष्ट्र शासनामार्फत नियुक्त केलेल्या नोटरींबाबत असे निदर्शनास आले आहे की, नोटरी म्हणून दस्तऐवज साक्षांकित करताना, नोटरी कायदा १९५२ वा नोटरी नियम १९५६ मधील कलम/ नियम विचारात घेऊन दस्तऐवज साक्षांकित करणे, नियम १० नुसार फी आकारणे इ. अपेक्षित असून सुध्दा नोटरी म्हणून स्वाक्षांकित करण्याकरिता सर्वसामान्यांकडून अतिरिक्त/अधिक फी वसूल करतात व अशा प्रकारची तक्रार प्राप्त झाल्यास संबंधित नोटरीची चौकशी करण्यात येऊन सदर नोटरी दोषी आढळल्यास मा.मुख्यमंत्री महोदयांच्या मान्यतेने योग्य ती कारवाई करण्यात येते.

(२) खात्रीलायकरित्या सांगता येत नाही.

(३) अशा प्रकारांना आळा घालण्याकरीता विधि व न्याय विभागाकडून क्रमांक विवन्यावि-२०१२/ नोटरी/ ई-शाखा, दिनांक १३ एप्रिल, २०१२ च्या पत्रान्वये जिल्हाधिकारी कार्यालय, तहसिल कार्यालय, जिल्हा न्यायालय व तालुका न्यायालय यांना त्यांच्या अधिनस्त कार्यालयातील सूचना फलकावर पुढील मजकूर ठळक अक्षरात प्रसिध्द करावा असे कळविण्यात आले आहे.

"नोटरींनी नोटरी नियम १९५६च्या कलम १० मधील तरतुदीनुसारच फी आकारावी व त्यासाठी अनुज्ञेय पावती संबंधित पक्षकारास तात्काळ उपलब्ध करण्यात यावी. नोटरीने काही गैरव्यवहार अथवा गैरवर्तणूक अथवा नियमबाहय वर्तन केल्यास, नोटरी नियम १९५६ च्या नियम १३ (फॉर्म १३) अन्वये संबंधित नोटरींविरुध्द सक्षम प्राधिकारी, विधि व न्याय विभाग, हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ यांचेकडे तक्रार पाठविण्यात यावी."

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**महाराष्ट्र सागरी क्षेत्र किनारा व्यवस्थापन प्राधिकरणाने खाडी किनाऱ्यांवर उभारण्यात आलेल्या इमारतींना भोगवटा प्रमाणपत्र देण्याच्या प्रस्तावास मान्यता दिल्याबाबत**

**(१४) २९१५० (१३-०४-२०१७). श्रीमती हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सागरी नियमन क्षेत्राच्या (सीआरझेड) नियमांकडे दुर्लक्ष करून नवी मुंबईतील पाम बीच मार्गासह अन्यत्र खाडी किनाऱ्यांवर उभारण्यात आलेल्या गगनचुंबी इमारतींना भोगवटा प्रमाणपत्र देण्यासंबंधीच्या प्रस्तावास महाराष्ट्र सागरी क्षेत्र किनारा व्यवस्थापन प्राधिकरणाने (एमसीझेडएमए) मान्यता दिली असल्याने माहे डिसेंबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नवी मुंबई, पनवेल, खारघर यासारख्या परिसरात उभारण्यात आलेल्या हजारो कोटी रुपयांच्या बांधकाम प्रकल्पांवर भोगवटा प्रमाणपत्राअभावी बसलेला अनधिकृत हा शिक्का दूर झाला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी सागरी नियमन क्षेत्राच्या हद्दीत असलेल्या बांधकामास धोका निर्माण झाल्यास शासन यास जबाबदार राहणार आहे काय,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१२-१०-२०१७) :** (१) व (२) हे खरे नाही.

नवी मुंबई महानगरपालिका कार्यक्षेत्रातील भुखंड हे सिडको प्राधिकरणाने महानगरपालिकेस वितरित केलेले आहेत. सदर भुखंडाचे मंजूर CZMP चे १:४००० ह्या प्रमाणकातील सी.आर.झेड.ने बाधित भुखंडाचा तपशिल दर्शविणारे नकाशे दिनांक ०१/०३/२०११ मध्ये सिडकोकडून महानगरपालिकेस प्राप्त झाले होते. त्यानुसार सी.आर.झेड.ने बाधित भुखंडावरील भोगवटा प्रमाणपत्राचे प्रस्ताव नाकारण्यात आले आहेत.

नवी मुंबई महानगरपालिका हद्दीतील १३० प्रकल्पांमधील इमारतींना ना-हरकत प्रमाणपत्र मिळण्याबाबतचा प्रस्ताव केंद्र शासनाच्या पर्यावरण व वन विभागास मान्यतेसाठी सादर करण्यात आला आहे. त्यास अद्याप मंजुरी प्राप्त झालेली नाही. दिनांक ०१/०३/२०११ पूर्वी देण्यात आलेल्या बांधकाम परवानगीस MCZMA ची परवानगी प्राप्त झाल्यानंतरच नवी मुंबई महानगरपालिकेकडून भोगवटा प्रमाणपत्र देण्यात येते. तर त्यानंतर महानगरपालिकेस प्राप्त झालेल्या प्रकरणात MCZMA ची परवानगी नसल्यास बांधकाम परवानगी देण्यात येत नाही.
(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यातील पोलीस प्राधिकरणातील प्रकरणाचा निपटारा करणेबाबत**

**(१५) २९८२८ (१३-०४-२०१७). श्री.तानाजी सावंत :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कायद्याचे रक्षक असलेल्या पोलिसांकडून सर्वसामान्य नागरिकांना त्रास झाल्यास त्यांच्याविरुद्ध दाद मागण्यासाठी प्राधिकरण दिनांक २ जानेवारी, २०१७ रोजीपासून सुरु करण्यात आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, पोलीस व्यवस्थेतील दोषांचा हा सामाजिक प्रश्न खूप पूर्वीपासूनचा असल्यामुळे या प्राधिकरणातील प्रकरणाचा निपटारा होण्यासाठी व पिडीत नागरिकांना दिलासा देण्यासाठी काही ठोस उपाययोजना सुचविण्यात आल्या आहेत काय,
(३) असल्यास, या प्राधिकरणापुढे पोलिसांकडून अत्याचारित प्रकरणाची आतापर्यंत किती सुनावण्या झाल्या आहेत व आतापर्यंत किती दोषी पोलीस अधिकारी यांच्यावर कोणती कार्यवाही करण्यात आली वा येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२८-०९-२०१७) :** (१) हे खरे आहे.

(२) महाराष्ट्र पोलीस अधिनियम (१९५१ चा २२) मधील कलम २२ प, अन्वये राज्य पोलीस तक्रार प्राधिकरणाची स्थापना करण्यात आली असून राज्य पोलीस तक्रार प्राधिकरण हे अ) स्वत: होऊन, किंवा

एक) एखादी व्यक्ती किंवा तिच्या कुटुंबातील सदस्य किंवा तिच्या वतीने इतर कोणतीही व्यक्ती,

दोन) राष्ट्रीय किंवा राज्य मानवी हक्क आयोग, आणि

तीन) पोलीस यांच्याकडुन एखाद्या पोलीस अधिकाऱ्यांविरुध्द आलेल्या खालील प्रकरणात चौकशी करु शकतात.

१) पोलीस कोठडीतील मृत्यू

२) भा.दं.वि.कलम ३२० खालील गंभीर दुखापत

३) बलात्कार किंवा बलात्कार करण्याचा प्रयत्न

४) विहित केलेली कार्यपध्दती न अनुसरता केलेली अटक किंवा स्थानबध्दता

५) भ्रष्टाचार

६) खंडणी उकळणे

७) जमीन/घर बळकावणे

८) कायद्याच्या तरतुदीचे गंभीर उल्लंघन या संबंधात राज्य पोलीस तक्रार प्राधिकरणाकडे आलेल्या तक्रारींची दखल घेतली जाते.

या प्राधिकरणांस दिवाणी न्यायालयाचे अधिकार दिले आहेत.

(३) जून, २०१७ पर्यंत प्राधिकरणापुढे १९५ प्रकरणांवर सुनावण्या झाल्या असून प्राधिकरणाकडून ७१ प्रकरणांवर अंतिम आदेश निर्गमित झालेल्या प्रकरणांमध्ये कोणीही पोलीस अधिकारी दोषी आढळले नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पुणे येथील मेट्रो प्रकल्पाला राष्ट्रीय हरित न्यायाधिकरणाने स्थगिती दिल्याबाबत

**(१६) २९८३९ (१३-०४-२०१७). श्री.तानाजी सावंत :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे येथील मेट्रो प्रकल्पाला राष्ट्रीय हरित न्यायाधिकरणाने नदीपात्रातील कामास स्थगिती दिली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त स्थगिती देण्याची कारणे काय आहेत,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकल्पाचे काम सुरु होण्याकरिता शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२३-१०-२०१७) :** (१) नाही.

(२) व (३) पुणे मेट्रो रेल्वे प्रकल्पासंदर्भात मा.राष्ट्रीय हरित न्यायाधिकरणाकडे दाखल झालेल्या तक्रारीच्या अनुषंगाने महामेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेड यांनी प्रस्तुत विषय हा मा.राष्ट्रीय हरित न्यायाधिकरणाच्या अधिकार क्षेत्रात येत नसल्याबाबत मा.सर्वोच्च न्यायालयात याचिका दाखल केली होती. सदर प्रकरणी मा.सर्वोच्च न्यायालयाने दिनांक १८/०९/२०१७ रोजी असे निर्देश दिले की, मा.राष्ट्रीय हरित न्यायाधिकरणास या विषयावर सुनावणी घेता येईल. परंतु त्यानुषंगाने कोणताही निर्णय पारित केल्यास तो मा.सर्वोच्च न्यायालयाच्या परवानगीच्या अधीन राहील तसेच पुणे मेट्रो प्रकल्पाच्या कोणत्याही कामावर निर्बंध नाहीत ज्यामध्ये मुठा नदीपात्रातील कामाचा अंतर्भूत असून सदर नदी पात्रात महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेड (महामेट्रो) यांच्याकडून लवकरच काम सुरु होणे अपेक्षित आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## वसई-विरार महानगरपालिकेत पूर्णवेळ सक्षम आयुक्त नेमण्याबाबत

**(१७) ३०२८६ (१३-०४-२०१७). श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वसई-विरार महनगरपालिकेत बहुतांश आयुक्त लिपिक दर्जाचे असून त्यांची प्रभारी सहाय्यक पदावर नियुक्ती करण्यात आली असल्याने त्याचा प्रशासकीय कामकाजावर परिणाम होत असल्याने तेथे पूर्णवेळ सक्षम आयुक्त

नेमण्याबाबत मा.मुख्यमंत्री यांच्याकडे तसेच नगरविकास विभागाकडे माहे ऑक्टोबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान एका नगरसेवकाने मागणी करून दोन वेळा प्रस्ताव दाखल केला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, वसई-विरार महानगरपालिकेत अधिकाऱ्यांची रिक्त पदे असल्याने व शासन नवीन भरती करीत नसल्याने महानगरपालिकेने प्रभारी सहाय्यक आयुक्त पदावर काम करून घेण्यासाठी महापालिकेने सुमारे ४८ लिपिकांना पत्र लिहून सेवा जेष्ठतेनुसार बढती देऊन प्रभाग समिती, विशेष नियोजन प्राधिकरण आदी ठिकाणी नियुक्ती करण्यात येत असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणाची एकूण किती सहाय्यक आयुक्तांची पदे रिक्त आहेत व अशी कोणकोणती किती रिक्त पदे भरली गेली आहेत त्याचा अहवाल शासनास सादर करण्यात आला आहे काय,

(४) असल्यास, अहवालाचे निष्कर्ष काय आहेत व त्यावर शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२६-१०-२०१७) :** (१) हे खरे आहे.

दिनांक १७/१०/२०१६ रोजी स्थानिक लोकप्रतिनिधी यांचे निवेदन शासनास प्राप्त झाले आहे.

तथापि, वसई विरार शहर महानगरपालिकेच्या आयुक्त पदी दिनांक ०७/१०/२०१५ च्या शासन आदेशान्वये श्री.सतिश लोखंडे, भा.प्र.से.यांची नियुक्ती करण्यात आली आहे.

(२) वसई विरार शहर महानगरपालिकेत सहाय्यक आयुक्त संवर्गाची ३१ पदे मंजुर असून त्यापैकी एका पदावर शासनाकडून प्रतिनियुक्तीने नियुक्त करण्यात आली आहे.

महानगरपालिकेच्या आस्थापनेवर सहाय्यक आयुक्त या पदावर पदोन्नतीसाठी एकही पात्र कर्मचारी नाही.

महानगरपालिकेने कामाच्या सोईसाठी नऊ प्रभाग समित्यां तसेच एका विशेष नियोजन प्राधिकरणासाठी कार्यरत लिपीक/ वरीष्ठ लिपीक यांची प्रभारी सहाय्यक आयुक्त म्हणुन नेमणूक केलेली आहे.

(३) व (४) वसई विरार शहर महानगरपालिकेत सहाय्यक आयुक्तांची ३० पदे रिक्त आहे. वसई विरार शहर महानगरपालिकेसाठी दिनांक ०९/०९/२०१४ च्या शासन निर्णयान्वये सेवा प्रवेश नियम व आकृतीबंधास मंजुरी देण्यात आली असून उक्त शासन निर्णयानुसार सहाय्यक आयुक्त पदावर प्रतिनियुक्तीने २५ % पदे भरण्याची तरतुद नमुद आहे.

तसेच शासन निर्णय दिनांक १७/१२/२०१६ नुसार प्रतिनियुक्तीने भरावयाचे धोरण निश्चित करण्यात आले आहे. उक्त शासन निर्णयानुसार कार्यवाही सूरू आहे.

त्याचप्रमाणे २५ % नामनिर्देशाने तात्काळ पदे भरण्याबाबतचे निर्देश आयुक्त, वसई विरार शहर महानगरपालिका यांना देण्यात आले आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**हवाला रॅकेटचे काम करणाऱ्या आयएसआय एजंटला**
**एटीएसने अटक केल्याबाबत**

**(१८) ३०९६५ (११-०८-२०१७). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) हवाला रॅकेटचे काम करणारा आयएसआय एजंट अल्ताफ कुरेशी याला दिनांक ३ मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास मुंबईतील नागपाडा परिसरात एटीएसने अटक केली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, अल्ताफ कुरेशी हा मुळ कोणत्या राज्याचा आहे व तो नागपाड्यात भाड्याच्या खोलीत रहात होता, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, अल्ताफ कुरेशीला नागपाड्यात भाड्याने खोली देणाऱ्या मालकासही पोलिसांनी अटक केली आहे काय व याप्रकरणी तपासाची सद्यःस्थिती काय आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (११-१०-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) व (३) अल्ताफ कुरेशी हा मुळ गुजरात राज्यातील रहीवाशी आहे व तो

कांजी जाधवजी बिल्डींग (तेलवाला बिल्डींग), तिसरा मजला, रु.नं. २७, खडक स्ट्रिट, मस्जित बंदर रेल्वे स्टेशन, मुंबई पश्चिम येथे भाड्याच्या खोलीत राहत होता.

सदर गुन्हयाचा तपास उत्तर प्रदेश दहशतवाद विरोधी पथक करीत आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात सायबर गुन्हयांना प्रतिबंध घालणेबाबत

**(१९) ३१०९० (११-०८-२०१७). श्री.संजय दत्त, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.धनंजय मुंडे : तारांकित प्रश्न क्रमांक २८५८० ला दिनांक १५ मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात सायबर गुन्हयांचा आलेख दिवसेंदिवस वाढत असून गेल्या तीन वर्षात राज्यात ५८६१ सायबर गुन्हे दाखल झाले आहेत व त्याला प्रतिबंध घालण्यासाठी सायबर सुरक्षेसाठी राज्य शासनाकडून ८३७ कोटी रुपये खर्चाचा प्रकल्प राबविण्याचा निर्णय माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान घेण्यात आला, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकल्पाचे स्वरुप काय आहे व सदर प्रकल्प किती कालावधीत कार्यान्वित करण्यात येणार आहे,

(३) असल्यास, राज्यात सायबर गुन्हयांचे प्रमाण वाढत असल्यामुळे उक्त प्रकल्प कार्यान्वित होईपर्यंत कोणती परिणामकारक प्रतिबंधात्मक व्यवस्था करण्यात आली वा येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२५-१०-२०१७) :** (१) राज्यात सन २०१४ ते २०१७ (माहे जून, २०१७ पर्यंत) ७९८९ इतक्या सायबर गुन्हयांची नोंद झाली आहे.

सायबर गुन्हयांना प्रतिबंध घालण्यासाठी महाराष्ट्र सायबर सुरक्षा प्रकल्पास माहे जून, २०१६ रोजी मान्यता देण्यात आली आहे.

(२), (३) व (४) सायबर गुन्हयांसंबंधात गुन्हयांचा शोध अधिक परिणामकारक व त्यात सुसुत्रता आणण्याकरिता सायबर कक्षाची स्थापना करण्यात आली आहे. प्रकल्पांतर्गत राज्यात ४७ सायबर लॅबची स्थापना करण्यात आली असून त्यांना पोलीस ठाण्याचा दर्जा देण्यात आला आहे. या सायबर लॅबमध्ये अत्याधुनिक तपास यंत्रे, साधनसामुग्री तसेच इतर उपकरणे यांची खरेदी व पुरवठा प्रक्रिया सुरु आहे.

सदर प्रकल्पांतर्गत तंत्रज्ञानयुक्त गुन्हे अन्वेषण केंद्र, तंत्रज्ञानयुक्त पोलिसिंग व विश्लेषण केंद्र, सायबर प्रशिक्षण केंद्र, सुरक्षा व्यवहार केंद्र, डाटा सेंटर इत्यादींचा समावेश आहे.

---

## नाशिक जिल्हयातील गोदावरी नदीच्या कुशीत जीवन व्यतित करणाऱ्या भिकाऱ्यांचे पुनर्वसन करण्याबाबत

**(२०) ३१३७७ (११-०८-२०१७). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर, श्री.संजय दत्त, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नाशिक जिल्हयातील गोदावरी नदीच्या कुशीत जीवन व्यतित करणाऱ्या भिकाऱ्यांवर कारवाईसाठी आता महापालिका धडक मोहिम राबवणार असून केंद्र शासनाच्या लाइव्हहुड मशिन योजनेतून बेघर निवारा केंद्र उभारुन येथे भिकाऱ्यांना स्थलांतरित केले जाणार असल्याचे दिनांक २५ एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी भिकाऱ्यांचे कायमस्वरुपी पुनर्वसन करण्याबाबत शासनाची भूमिका काय आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२४-१०-२०१७) :** (१) केंद्र व राज्य शासन पुरस्कृत दीनदयाळ अंत्योदय योजना-राष्ट्रीय नागरी उपजीविका अभियान योजनेची दिनांक २८/०८/२०१४ पासून नाशिक महानगरपालिका कार्यक्षेत्रात अंमलबजावणी करण्यात येत आहे.

या योजनेंतर्गत नाशिक शहरातील भिकाऱ्यांना व बेघर/निराश्रीत लाभार्थींना निवारा केंद्रांमध्ये स्थलांतरीत केले जाणार आहे.

(२) या योजनेतील 'शहरी बेघरांना निवारा' या उपांगाअंतर्गत नाशिक शहरातील बेघर लाभार्थींना कायमचा निवारा उपलब्ध करण्याच्या अनुषंगाने, कायमचे निवारा केंद्र बांधण्यासाठी नाशिक महानगरपालिकेमार्फत कार्यवाही सुरु आहे.

तसेच कायमच्या निवारा केंद्राचे बांधकाम होईपर्यंत तात्पुरते निवारे महानगरपालिकेमार्फत कार्यान्वित करण्यात आलेले आहेत.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**कल्याण-डोंबिवली महापालिकेत एका मागासवर्गीय कर्मचाऱ्याचा मानसिक छळ झाल्याबाबत**

**(२१) ३१५०३ (११-०८-२०१७). श्री.विजय उर्फ भाई गिरकर, ॲड.अनिल परब :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेत एका मागासवर्गीय कर्मचाऱ्याचा मानसिक छळ झाला असल्याची बाब निदर्शनास आली असून त्याबाबत दाखल केलेल्या तक्रारीत सत्यता असल्याचेही निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याप्रकरणी सदर कर्मचाऱ्याने संबंधितांवर कारवाई करण्यासाठी महानगरपालिका प्रशासनाकडे मागणी केली असून महापालिकेने अद्याप कोणतीच कारवाई केली नसल्याचे माहे जून, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले, तद्नुसार दोषीविरुध्द कारवाई करण्यास विलंब करणाऱ्या व्यक्तीवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (३०-१०-२०१७)** : (१) कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेतील एका लिपिकाने याबाबत अनुसूचित जाती जमाती आयोगाकडे तक्रार दाखल केली होती. सदर तक्रारीसंदर्भात सखोल चौकशी/तपासणी करुन केलेल्या कार्यवाहीचा अहवाल सादर करण्याबाबत आयोगाने त्यांच्या दिनांक ०९/०१/२०१७ च्या पत्रान्वये महानगरपालिकेस निर्देश दिले आहेत.

(२) व (३) सदर तक्रारीच्या अनुषंगाने तक्रारीत नमूद अधिकारी/कर्मचारी यांच्याकडून महानगरपालिकेने खुलासे मागविले होते. सदर खुलासे प्राप्त झाले असून, खुलाशांची तपासणी महानगरपालिका स्तरावर सुरु आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**ध्वनिप्रदुषणावर नियंत्रण ठेवण्याबाबत**

**(२२) ३१५०६ (११-०८-२०१७). श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई आणि ठाणे पोलिसांचे अधिकृत ट्विटर अकाऊंट हे ध्वनीप्रदुषणाच्या तक्रारींसाठी प्रसिध्द असून या तक्रारींची दखल घेऊन त्यावर कारवाई केली जात असल्याचे दिनांक १४ एप्रिल, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, आवाज फाउंडेशन या संस्थेद्वारे करण्यात आलेल्या सर्वेक्षणात मुंबई शहर व उपनगरातील महापालिका, शासकिय व खाजगी रुग्णालयाच्या परिसरात ध्वनी प्रदुषणासंदर्भात सर्व नियमांचे उल्लंघन होत असून ध्वनीप्रदुषणाचे प्रमाण वाढत असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, ध्वनीप्रदुषणाची पोलीस ठाण्यात तक्रार केली असता तक्रारीची शहानिशा करण्यासाठी पोलीस गेले असता पोलीस दिसताक्षणी आवाज बंद केला जात असल्याचे आढळून आले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून ध्वनिप्रदुषणावर नियंत्रण ठेवण्याकरिता कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (११-१०-२०१७) :** (१), (२) व (३) नागरीकांद्वारे ट्वीटरवर ध्वनीप्रदुषणाची तक्रार प्राप्त होताच ती मुख्य नियंत्रण कक्षामार्फत संबंधीत पोलीस ठाण्यास कळविण्यात येते. ध्वनीक्षेपक चालू असल्याचे आढळुन आल्यास संबंधित पोलीस ठाण्यामार्फत पर्यावरण संरक्षण अधिनियम, १९८६ व ध्वनी प्रदुषण (विनियमन व नियंत्रण) नियम, २००० मधील तरतूदींच्या अनुषंगाने कारवाई करण्यात येते. ध्वनी प्रदुषण नियमान्वये सन २०१६ मध्ये २३२ तसेच जानेवारी ते ऑगस्ट, २०१७ या कालावधीत ४५३ अशा एकुण ६८५ कारवाया करण्यात आल्या आहेत.

तक्रारी प्राप्त झाल्यास कार्यप्रणाली (S.O.P.) प्रमाणे कार्यवाही करण्यात येते.

(४) मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी दिलेल्या आदेशान्वये ध्वनी प्रदुषण नियमांची प्रभावी अंमलबजावणी होण्याकरीता बृहन्मुंबई पोलीस आयुक्तालय परिक्षेत्राकरीता ५ संनियंत्रण समित्या स्थापन करण्यात आल्या आहेत.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यात गवतापासून मद्य निर्मिती करण्याबाबत**

**(२३) ३१५२१ (१९-०८-२०१७). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले, श्री.धनंजय मुंडे, श्री.जयवंतराव जाधव, श्रीमती हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **राज्य उत्पादन शुल्क मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात गवतापासून मद्य निर्मिती करण्यासाठी पथदर्शी प्रकल्पाचा आराखडा तयार करण्याचे काम सुरु करण्यात आले असल्याचे अधिक्षक, राज्य उत्पादन शुल्क यांनी पुणे येथे दिनांक ५ मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास जाहिर केले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, यास मंत्रिमंडळाने चर्चा करुन संमती दिली आहे काय, त्यावर शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रशेखर बावनकुळे (०२-११-२०१७)** : (१) नाही.
(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**मुंबईत भोईवाडा पोलीस ठाण्यात कर्तव्यावर असलेल्या महिला शिपाई यांना मारहाण झाल्याबाबत**

**(२४) ३१७६२ (१८-०८-२०१७). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.संजय दत्त, श्री.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईत भोईवाडा पोलीस ठाण्यात कर्तव्यावर असलेल्या महिला शिपाई अलका साळवे-सकट यांना शेजारी राहणाऱ्या एका महिलेने व तिच्या दोन मुलांनी बेदम मारहाण केली असून साळवे यांचा डावा हात फ्रॅक्चर झाला असल्याचे दिनांक १८ एप्रिल, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी साळवे यांनी भोईवाडा पोलीस ठाण्याचे वरिष्ठ निरीक्षक, सहाय्यक आयुक्त, उपायुक्तांकडे तक्रारी केली परंतु, अद्याप याप्रकरणी गुन्हा दाखल झालेला नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, राज्य ओबीसी कास्ट्राइब कर्मचारी महासंघाचे अध्यक्ष व अन्य पदाधिकारी यांनी पोलीस सहआयुक्त यांची भेट घेत गुन्हा नोंद व्हावा व आरोपींना अटक व्हावी तसेच गुन्हा नोंदविण्यास टाळाटाळ करणाऱ्या पोलिसांवर कारवाई व्हावी अशा मागण्याचे निवेदन दिले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त महिला शिपाई यांना न्याय मिळण्याबाबत तसेच मारहाण करणाऱ्या आरोपींवर शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२५-१०-२०१७) :** (१) वैद्यकीय अधिकारी, नागपाडा पोलीस रुग्णालय, मुंबई यांनी दिलेल्या अहवालावरून महिला शिपाई अलका साळवे-सकट यांच्या डाव्या हाताच्या तर्जनीस फ्रॅक्चर असल्याचे निदर्शनास आले आहे.

(२) उक्त प्रकरणी भोईवाडा पालीस ठाणे गु.र.क्र.९०/१७, भादंवि कलम ३२५, ३२३, ५०९, ५०४, ३४ अन्वये गुन्हा दाखल केला आहे.

(३) होय.

(४) सदर प्रकरणी तीन आरोपींना अटक करण्यात आली असून, सध्या ते जामीनावर मुक्त आहेत.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## ठिबक सिंचन साहित्य निर्माण कपन्यांची रद्द केलेली नोंदणीबाबत

**(२५) ३१७८२ (०७-०८-२०१७). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.किरण पावसकर, श्री.धनंजय मुंडे, श्री.जयवंतराव जाधव, ॲड.निरंजन डावखरे, श्री.हेमंत टकले :** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) ठिबक सिंचनाचे निकृष्ठ दर्जाचे साहित्य शेतकऱ्यांना पुरविल्याबद्दल मुख्य सचिवांच्या समितीने चौकशी केल्यानंतर चार कंपन्याचे नोंदणी परवाने रद्द करण्याचे आदेश कृषी आयुक्त यांनी दिनांक ३० जुलै, २०१६ रोजी काढल्यानंतर मंत्रालयातील कृषी विभागातील उप सचिवांनी दिनांक ५ एप्रिल, २०१७ रोजी वा त्यासुमारास उपरोक्त चार कंपन्यावर असलेली बंदी मागे घेण्याचे आदेश काढण्यात आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार गैरव्यवहार करणाऱ्यावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. पांडुरंग फुंडकर (२३-१०-२०१७) :** (१) व (२) संचालक (फलोत्पादन) यांनी दिनांक ३० जुलै, २०१७ च्या आदेशान्वये ४ कंपन्याची नोंदणी रद्द करुन त्या

कंपन्याना १० वर्षाच्या कालावधीसाठी शासनाच्या कोणत्याही योजनेत भाग घेण्यास बंदी घातली. सदर आदेशाविरुद्ध सदर कंपन्यांनी शासनास निवेदने सादर केली. सदर कंपन्यांच्या प्रतिनिधीचे म्हणणे मा.मंत्री (कृषी) यांनी ऐकून घेवून VSI संस्थेकडून करण्यात आलेल्या तपासणीत अप्रमाणित आढळून आलेल्या बॅचचे क्षेत्रिय पातळीवर उपलब्ध असलेले नमुने CIPET (Central Instituted of Plastic Engineering & Technology), औरंगाबाद या शासनमान्य संस्थेकडून फेरतपासणी करण्याचे आदेश दिले. उपलब्ध असलेले सर्व नमुने फेरतपासणीत प्रमाणित आढळून आल्याने, नैसर्गिक न्यायाच्या दृष्टीकोनातून त्यांना संधी मिळणे आवश्यक असल्यामुळे, त्यांच्यावर असलेली १० वर्षाची बंदी सन २०१६-१७ या वर्षापुर्ती मर्यादित करण्यात येवून सन २०१७-१८ या वर्षाकरीता पुनर्नोंदणी करण्यासाठी दिनांक ५ एप्रिल, २०१७ च्या पत्रान्वये शासन मान्यता कळविण्यात आली आहे.

यापकरणी कोणताही गैरव्यवहार नसल्याने कारवाई करण्याचा प्रश्न उद्‌भवत नाही.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नाशिक शहरातील गोदावरी नदीपात्र प्रदुषण मुक्त करणेबाबत

**(२६) ३१८०१ (११-०८-२०१७). श्री.जयवंतराव जाधव, श्री.अमरसिंह पंडित, श्री.धनंजय मुंडे, श्री.नरेंद्र पाटील, डॉ.अपूर्व हिरे : दिनांक २ ऑगस्ट, २०१७ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक ५ मधील प्रश्न क्रमांक २७६०० ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नाशिक शहरात सिंहस्थ कालावधीत बांधण्यात आलेले घाट व त्यालगतची जागा महानगरपालिकेकडे हस्तांतरित करण्यासाठी नाशिक महानगरपालिकेने जिल्हाधिकारी, नाशिक यांचेकडे प्रस्ताव पाठविलेला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, घाट व त्यालगतची जागा तसेच साधुग्राम व इतर मोकळ्या भूखंडांचा वापर चौपाटी, विविध प्रदर्शने, सार्वजनिक सभा-समारंभ, फेस्टिवल, क्रीडा स्पर्धा व तत्सम प्रयोजनासाठी केल्यास त्याद्वारे शहराच्या पर्यटनात

वाढ होवून महानगरपालिकेचे उत्पन्न वाढेल अशी सूचना स्थानिक लोकप्रतिनिधींनी दिनांक १५ ऑक्टोबर, २०१५ रोजी वा त्यासुमारास केली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, गोदावरी नदी स्वच्छतेसाठी निविदा काढूनही ठेकेदाराकडून प्रतिसाद न मिळणे, गोदावरी अस्वच्छ होवू नये यासाठी गोदावरी संवर्धन कक्षाची स्थापना, दंडात्मक कारवाई इत्यादी उपाययोजना करूनही नदीपात्र अजुनही अस्वच्छ असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, महापालिकेच्या मलनि:स्सारण केंद्राच्या क्षमतावाढीसाठी तसेच महापालिका क्षेत्रातुन वाहणाऱ्या संपुर्ण गोदावरी नदी प्रदुषण मुक्तीसाठीचा आराखडा सादर करण्याचे आदेश विभागीय महसुल आयुक्त (नाशिक) यांनी महापालिकेस दिनांक २ जून, २०१७ रोजी वा त्यासुमारास दिले आहेत, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, गोदावरी नदीपात्र प्रदुषण मुक्तीचा आराखडा महानगरपालिकेकडून सादर करण्यात आला आहे काय, स्वच्छतेसाठी निविदा काढून एजन्सी निश्चित करण्यात आली आहे काय व प्रत्यक्ष स्वच्छतेचे काम सुरु करण्यात आले आहे काय,

(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१०-१०-२०१७) :** (१) सिंहस्थ कालावधीत बांधण्यात आलेले घाट देखभालीसाठी महानगरपालिकेकडे हस्तांतरीत करण्यात आले आहेत.

तसेच, कन्नमवार पुल ते लक्ष्मीनारायण पुला दरम्यानच्या घाटाची जागा विकसनासाठी महानगरपालिकेस वर्ग करण्याबाबत नाशिक महानगरपालिकेने जिल्हाधिकारी, नाशिक यांचेकडे दिनांक १२/०२/२०१६ अन्वये प्रस्ताव सादर केला आहे.

(२) होय.

सिंहस्थ कुंभमेळ्यासाठी राखीव ठेवण्यात आलेल्या ३२५ एकर जागेपैकी महानगरपालिकेच्या मालकीची ५४ एकर जागा सिंहस्थ व्यतिरिक्त इतर कालावधीत सार्वजनिक सभा, मेळावे, उत्सव, प्रदर्शन, क्रिडा स्पर्धा, वाहनतळ, सर्कस, इत्यादी साठी वापरणेबाबत महानगरपालिकेमार्फत निर्णय

घेण्यात आला आहे.

(३) हे खरे नाही.

(४) व (५) होय.

याबाबत दिनांक २९ मे, २०१७ रोजी विभागीय आयुक्त, नाशिक यांचेकडे झालेल्या आढावा बैठकीत, विभागीय आयुक्त, नाशिक यांनी महानगरपालिकेस आदेश दिले आहेत.

त्यानुसार महानगरपालिकेने विभागीय आयुक्त, नाशिक यांचेकडे आराखडा सादर केला आहे.

तसेच गोदावरी नदी स्वच्छतेसाठी महानगरपालिके मार्फत निविदा काढण्यात आली असून, निविदा प्रक्रिया प्रगतीत आहे.

(६) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेच्या रस्ता रुंदीकरणात विस्थापित होणाऱ्या नागरिकांच्या पुनर्वसनाबाबत**

**(२७) ३२५२८ (११-०८-२०१७). श्री.अमरिशभाई पटेल, श्री.संजय दत्त : तारांकित प्रश्न क्रमांक २८३२९ ला दिनांक २२ मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कल्याण-डोंबिवली महानगरपालिका प्रशासनाने रस्ता रुंदीकरणात विस्थापित होणाऱ्या नागरिकांचे पुनर्वसन करण्यासाठी कोणतेही धोरण ठरविले नसल्याची बाब माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, कल्याणमधील रस्ता रुंदीकरणामुळे विस्थापितांच्या पुनर्वसनाच्या प्रश्नाबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१७-१०-२०१७) :** (१) हे खरे नाही.

कल्याण-डोंबिवली महानगरपालिका क्षेत्रातील रस्ता रुंदीकरणात विस्थापित होणाऱ्या नागरिकांच्या पुनर्वसनाबाबत महानगरपालिकेच्या दिनांक १०/१२/१९९९ रोजीच्या सर्वसाधारण सभेने धोरण निश्चित केलेले आहे. तसेच महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेने सुधारीत पुनर्वसन धोरण आखणीबाबत सुचना दिलेल्या असून त्यानुसार सुधारीत पुनर्वसन धोरणाची कार्यवाही प्रगतीपथावर आहे.

(२) महानगरपालिकेच्या दिनांक १०/१२/१९९९ रोजीच्या सर्वसाधारण सभेने निश्चित केलेल्या धोरणानुसार ज्यांचे अधिकृत घर १०० टक्के बाधित होत आहे, त्यांना त्यांच्या क्षेत्रफळाचा उपलब्ध भूखंड अथवा टी.डी.आर., आणि २५ टक्के ते ५० टक्के व त्यापेक्षा जास्त बाधित होत आहे, त्यांना टी.डी.आर./एफ.एस.आय. देण्यात येतो.

तसेच ज्या बाधित धारकांनी टी.डी.आर. किंवा अतिरिक्त एफ.एस.आय.चा पर्याय निवडलेला नाही, अशा पात्र बांधकामधारकांना पर्यायी जागा देण्याकरीता महानगरपालिकेचे शहर अभियंता यांच्या अध्यक्षतेखाली नियुक्त पुनर्वसन समितीमार्फत निर्णय घेण्यात येतो.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**कोकणातील गड-किल्लांच्या संवर्धनासाठी निधीची तरतूद करण्याबाबत**

**(२८) ३२५९३ (११-०८-२०१७). श्री.सुभाष झांबड, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **सांस्कृतिक कार्य मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कोकणातील रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग जिल्हयातील गड-किल्ल्यांच्या संवर्धनाकडे शासन दुर्लक्ष करीत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोकणातील गड-किल्लांच्या संवर्धनासाठी निधीची तरतूद करुन देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (३१-१०-२०१७) :** (१) हे खरे नाही.

(२) रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग जिल्हयातील ११ किल्ले राज्य संरक्षित स्मारके म्हणून घोषित केलेली आहेत व भारतीय पुरातत्व सर्वेक्षण विभागाने २१ किल्ले राष्ट्रीय संरक्षित किल्ले म्हणून घोषित केलेली आहेत. कोकणातील १३ किल्ले राज्य संरक्षित स्मारक म्हणून घोषित करण्याची कार्यवाही सुरु आहे. राज्य संरक्षित स्मारकांच्या जतन-दुरुस्तीची कामे हाती घेण्यात आलेली आहेत तसेच राष्ट्रीय संरक्षित किल्ल्यांची जतन-दुरुस्ती केंद्र शासनाच्या भारतीय पुरातत्व सर्वेक्षण विभागामार्फत केली जातात.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**राज्य शासनाच्या सेवेतील रिक्त पदांबाबत**

**(२९) ३२६६१ (११-०८-२०१७). श्री.कपिल पाटील, श्री.संजय दत्त, श्री.शरद रणपिसे, श्री.रामहरी रुपनवर, श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे : दिनांक ३० मार्च, २०१७ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक २ मधील प्रश्न क्रमांक २३५०३ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील सुमारे १२ हजार शासकीय अधिकारी व कर्मचारी माहे जून, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान सेवानिवृत्त होणार आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, एकाच वेळी मोठ्या प्रमाणात अधिकारी व कर्मचारी सेवानिवृत्त होणार असल्याने त्याचा परिणाम प्रशासनाच्या कामकाजावर होण्याची भिती व्यक्त करण्यात येत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, राज्य शासनाच्या सेवेत १,७७,००० पदे रिक्त असल्याचे अलिकडेच निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त रिक्त पदांच्या भरतीचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन आहे काय व त्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१६-१०-२०१७) :** (१) माहे एप्रिल, २०१७ ते माहे जून, २०१७ या कालावधीत सेवार्थ प्रणालीत असलेल्या नोंदीनुसार एकूण १२,१७१ अधिकारी/ कर्मचारी सेवानिवृत्त झाले आहेत.

(२) हे खरे नाही.

राज्य शासनाच्या सेवेतील अधिकारी/ कर्मचारी सेवानिवृत्त होणे, ही स्वाभाविक प्रक्रिया आहे. मात्र या सेवानिवृत्तीमुळे शासनाच्या प्रशासकीय कामकाजावर विपरित परिणाम न होण्याच्या दृष्टीने राज्य शासनाच्या सेवेत सद्य:स्थितीत कार्यरत असलेले अधिकारी/ कर्मचारी यांच्या माध्यमातून शासकीय कामकाज शक्य तितक्या परिणामकारकरीत्या पार पाडण्यात येत आहे,

(३) माहे डिसेंबर, २०१६ अखेरच्या उपलब्ध आकडेवारीनुसार राज्यातील शासकीय कार्यालये व जिल्हा परिषदांमधील एकूण १,७६,९६७ एवढी पदे रिक्त आहेत.

(४) राज्य शासनाच्या सेवेतील पदोन्नतीच्या कोट्यातील रिक्त पदे भरण्यासंदर्भात कोणतेही निर्बंध नाहीत. सरळसेवेने पदभरतीबाबत अंशत: निर्बंध असले तरी विहीत मर्यादेपेक्षा जास्त पदे भरावयाची असल्यास अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीकडून त्याबाबत परवानगी दिली जाते.

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून देखील भरतीप्रक्रिया चालू असून सेवानिवृत्ती, मृत्यू इत्यादी कारणांमुळे पदे रिक्त होणे व अशी पदे विहित पध्दतीनुसार भरली जाणे ही निरंतर चालणारी प्रक्रिया आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई शहर व उपनगरात पोलिसांवरील हल्ल्यात वाढ झाल्याबाबत

**(३०) ३२७०२ (११-०८-२०१७). प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई शहर व उपनगरात नाकाबंदी आणि गस्त घालणाऱ्या पोलिसांशी अरेरावीची भाषा करुन त्यांना धमक्या देण्याच्या तसेच पोलिसांवर हल्ले

करण्याच्या प्रकारामध्ये वाढ झाल्याचे माहे जून, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, असे प्रकार वारंवार घडत असल्याने पोलिसांमध्ये असुरक्षिततेची भावना निर्माण झाली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, या प्रकारांना आळा बसण्याकरिता शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२५-१०-२०१७) :** (१) बृहन्मुंबई पोलीस आयुक्तालयाच्या कार्यक्षेत्रात नाकाबंदी आणि गस्त घालणाऱ्या पोलिसांशी अरेरावीची भाषा करुन त्यांना धमक्या देण्याच्या तसेच पोलिसांवर हल्ले करण्याच्या जानेवारी, २०१६ ते जून, २०१६ या कालावधीत एकूण १७९ गुन्हे नोंदविलेले आहेत, तर जानेवारी, २०१७ ते जून, २०१७ या कालावधीत १२४ गुन्हे नोंदविलेले आहेत.
(२) नाही.
(३) बृहन्मुंबईतील सर्व पोलीस ठाण्यांतून त्या-त्या पोलीस ठाणेच्या कार्यक्षेत्रातील मोहल्ला कमिटी, महिला दक्षता कमिटी, सामाजिक कार्यकर्त्यांच्या सभा, तसेच, व्यापाऱ्यांच्या सभा आयोजित करुन नागरिकांनी शिस्त पाळुन कायद्याचा आदर करावा, कर्तव्य बजावीत असलेल्या पोलिसांशी वाद घालुन शासकीय कामात अडथळे आणु नये. तसेच, पोलिसांवर हल्ले करु नये याबाबत वेळोवेळी प्रबोधन केले जाते. पोलीस अधिकारी व कर्मचाऱ्यांना नागरिकांशी सलोख्याने वागण्याबाबत सूचना देण्यात आलेल्या आहेत. यानंतरही जर पोलिसांवर हल्ला झाल्यास त्याबाबत कायदेशिर गुन्हे नोंदवुन संबंधितांवर कारवाई केली जाते. तसेच, हल्लेखोरांवर प्रतिबंधक कारवाई केली जाते.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**सेनगांव (जि.हिंगोली) शहरात कचरा डेपो नसल्याने घनकचऱ्याचे ठिकठिकाणी ढिग साचल्याबाबत**

**(३१) ३२७१९ (११-०८-२०१७). श्री.रामराव वडकुते :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सेनगांव (जि.हिंगोली) शहरात कचरा डेपो नसल्याने घनकचऱ्याचे ठिकठिकाणी ढिग साचले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, शहरात ठिकठिकाणी प्लास्टिक पिशव्यांचा मोठया प्रमाणात खच पडल्याने नालेही तुंबले आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, नाल्यांमधून पाणी प्रवाहित होत नसल्याने दुर्गंधी पसरुन नागरिकांचे आरोग्य धोक्यात आले आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (०३-१०-२०१७)** : (१) शहरातील घनकचरा व्यवस्थापनासाठी नगर पंचायत मालकीची क्षेपणभूमी (Dumping ground) उपलब्ध नाही. ग्रामपंचायत काळापासून शहरातील कचरा शासकीय जमीन गट नं. ५०४ मध्ये टाकला जातो. शहरामध्ये दररोज कचरा संकलन करण्यात येते व सदर क्षेपणभूमीवर कचरा जमा करण्यात येतो. त्यामुळे शहरामध्ये सद्य:स्थितीत कोठेही ढिग साचले नाहीत.
(२) व (३) हे खरे नाही.
(४) शहरातील अस्तित्वात असणाऱ्या नाल्यांची मान्सुनपूर्व सफाई करण्यात आलेली आहे. त्यामुळे सद्य:स्थितीत शहरामध्ये कोठेही प्लॉस्टीक पिशव्या नाल्यामध्ये बुडुन नाली तुंबलेल्या नाहीत.

नगर परिषदेने १४ व्या वित्त आयोगामधून घनकचरा व्यवस्थापनाअंतर्गत शहरातील नालेसफाई करणे, घरोघरी जाऊन कचरा गोळा करणे, कचऱ्यांची वाहतूक क्षेपणभूमीपर्यंत वाहतूक करणे, रस्त्यांची साफ सफाई करणे याबाबतची निविदा प्रक्रिया पूर्ण करुन दिनांक ०७/०६/२०१७ रोजी संबंधित ठेकेदारास कार्यारंभ आदेश दिलेले असून सध्या शहरातील कचरा दररोज गोळा केला जात आहे व नालेसफाई व रस्त्यांची साफसफाई नियमितपणे केली जात आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात बोगस औषधांवर प्रतिबंध करण्यासाठी उपाययोजना करण्याबाबत

**(३२) ३२७६५ (११-०८-२०१७). श्री.अमरिशभाई पटेल, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **अन्न व औषध प्रशासन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील जनतेच्या आरोग्यासाठी अन्न व औषधांचा दर्जा तपासण्यासाठी स्थापन करण्यात आलेला दक्षता विभाग अन्न व औषध प्रशासनाने बंद केला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शासनाला पुर्वकल्पना न देता सदरील दक्षता विभाग बंद करण्यामागील कारणे काय आहेत,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन बनावट औषधांवर नियंत्रण ठेवून, तयार होणाऱ्या औषधांचा दर्जा नियमितपणे तपासणीसाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीश बापट (२४-१०-२०१७) :** (१) हे खरे नाही.

(२) प्रश्न उद्‌भवत नाही.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात दुध भेसळ करणाऱ्यांवर कारवाई करण्याबाबत

**(३३) ३२८७४ (११-०८-२०१७). डॉ.अपूर्व हिरे : दिनांक ३ ऑगस्ट, २०१६ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक ५ मधील प्रश्न क्रमांक १८५९५ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **अन्न व औषध प्रशासन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) महाराष्ट्र राज्यात अन्न व सुरक्षा माणके अधिनियम २००६ दिनांक ५ ऑगस्ट, २०११ पासून अंमलात आलेला असून दुध भेसळ प्रकरणी कार्यवाही करण्याचे अधिकार आयुक्त, अन्न व औषध प्रशासन विभागाकडे

वर्ग करण्यात आले असून कलम ५९ मध्ये कारावासाच्या शिक्षेचा कालावधी व द्रव्य दंडाची रक्कम वाढविण्याची शिफारस राज्य शासनाने केंद्र शासनाने गठीत केलेल्या सुधारणा समितीस केलेली असून केंद्र शासनस्तरावर प्रलंबित असलेल्या सदरील बाबी संबंधीच्या प्रस्तावास केंद्र शासनाकडून अंतिम निर्णय घेण्यात आला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यात शासनाच्या दूध पुरवठ्याअभावी ग्राहकांना सकस दुध मिळत नसल्यामुळे भेसळयुक्त दुधाचे प्रमाण वाढले असून दुधात घातक पदार्थाची भेसळ करणाऱ्या आणि लहान बालके व सर्वच जनतेच्या आरोग्याशी घातक खेळ खेळणाऱ्यांविरुध्द शिक्षेची तरतूद असलेल्या प्रस्तुत सुधारित अधिनियमांची अंमलबजावणी करण्यासंबंधी कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) असल्यास, अन्न व औषध प्रशासन विभागाकडून दुध भेसळ करणाऱ्यांविरुध्द कारवाई होत नसल्यानेच ऑक्सीटॉक्सिन या मानवी आरोग्यास घातक इंजेक्शनचा सर्रास वापर होणे व भेसळीचे दुध विक्री होणे, दुधात घातक रसायनांची भेसळ करणे असे प्रकार वारंवार होत असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, दूध भेसळप्रकरणी शिक्षेची तरतूद असलेल्या अधिनियमातील दुरुस्तीच्या प्रस्तावास अद्याप केंद्र शासनाकडून मंजुरी मिळालेली नसल्यास, यासाठी होत असलेल्या विलंबाची सर्वसाधारण कारणे काय आहेत व या प्रस्तावास केव्हापर्यंत मंजुरी मिळणे अपेक्षित आहे ?

**श्री. गिरीश बापट (२६-१०-२०१७) :** (१) हे अंशत: खरे आहे.

महाराष्ट्र राज्यात अन्न सुरक्षा व मानके अधिनियम २००६ दिनांक ०५ ऑगस्ट २०११ पासून अंमलात आलेला असुन दुध भेसळ प्रकरणी कार्यवाही करण्याचे अधिकार आयुक्त, अन्न व औषध प्रशासन विभागाकडे नव्याने वर्ग केलेले नसून पुर्वीपासूनच आहेत.

कलम ५९ अन्वये कारावासाच्या शिक्षेचा कालावधी व द्रव्य दंडाची रक्कम वाढविण्याची शिफारस राज्य शासनाने केंद्र शासनास गठीत केलेल्या सुधारणा समितीस केलेली असून त्याबाबत अद्याप अंतिम निर्णय झालेला नाही.

(२) प्रश्न उद्‌भवत नाही.

(३) हे खरे नाही.

(४) अन्न सुरक्षा व मानके प्राधिकरण, नवी दिल्ली यांचेद्‌वारे समिती गठीत करुन केंद्रशासनाने सदर अधिनियमातील दुरुस्तीबाबत प्रस्तावाची मागणी केली होती. त्यानूसार सदरचा प्रस्ताव सादर करण्यात आला आहे. सदर समिती संपूर्ण देशासाठी गठीत केलेली असून विविध राज्यांचे विविध प्रस्ताव सदर समितीपुढे ठेवण्यात आले आहेत. अंतिम निर्णय ही केंद्र शासनाच्या अखत्यारीतील बाब आहे.

---

**नागपूर महानगरपालिकेच्या कचरापेटी मोफत देण्याच्या योजनेबाबत**

**(३४) ३२९०० (११-०८-२०१७). श्री.प्रकाश गजभिये :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर येथे नागरिकांना ओला व सुका कचरा वेगवेगळा जमा करण्यासाठी कचरापेटी मोफत देण्याची किंवा रोख रक्कम देण्याची बाब महानगरपालिकेच्या विचाराधीन आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या योजनेत आता बदल करुन आर्थिकदृष्टया दुर्बल लोकांसाठी ही योजना राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या योजनेत किती लोकांना कचरापेटया मोफत वितरीत करण्यात आल्या आहेत,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (०९-०९-२०१७) :** (१) अंशत: खरे आहे.

रहिवासी घरांना कचरापेटी मोफत देण्याची बाब खरी असून, रोख रक्कम देण्याची बाब खरी नाही.

(२) हे खरे नाही.

(३) व (४) सद्य:स्थितीत ८७०८ नागरिकांना कचरा पेट्या मोफत वितरीत करण्यात आल्या आहेत.

---

## मुंबई मेट्रो ने सवलतीमध्ये घट केल्याबाबत

**(३५) ३२९२८ (११-०८-२०१७). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई मेट्रो ने दिनांक १ जून, २०१७ पासून भाडे न वाढवता सवलतीमध्ये घट केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, कोणत्या सवलतीमध्ये घट करण्यात आली आहे,

(३) असल्यास, सवलतीमध्ये घट करण्याची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२३-१०-२०१७) :** (१) होय.

(२) व (३) मुंबई मेट्रोने दिनांक १२ जून, २०१७ पासून सवलतदाराने मेट्रोचे भाडे दर न वाढवता मासिक पास, प्रवास परतीचे तिकिट (रिर्टन तिकिट) व स्मार्ट कार्ड फेअर या सवलतीमध्ये घट केली असून त्यामुळे मेट्रो चालविण्यासाठी जो तोटा होत होता तो यामुळे रु.१२ कोटीने कमी होणार आहे.

---

## नागपूर येथील गंगानगर झोपडपट्टीतील अनधिकृत घरांबाबत

**(३६) ३२९६८ (११-०८-२०१७). श्री.प्रकाश गजभिये :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर येथील गंगानगर झोपडपट्टीतील ३९ अनधिकृत घरे दिनांक १ जून, २०१७ रोजी वा त्यासुमारास नागपूर महापालिका, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण व नागपूर सुधार प्रन्यासने पाडली आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, आणखी किती घरे याच ठिकाणी अनधिकृतपणे आहेत व त्यांचेवर कारवाई केंव्हा करण्यात येणार आहे,

(३) असल्यास, या ठिकाणी राहणाऱ्या नागरिकांचे पुनर्वसन कोणत्या ठिकाणी व केंव्हा करण्यात येणार आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (०९-०९-२०१७) :** (१) मौजा झिंगाबाई टाकळी येथील खसरा क्र. २०५/२ (झुडपी जंगल) येथील जेएनएनयुआरएम-बीएसयुपी योजनेतंर्गत पात्र असलेल्या लाभार्थ्यांना सदनिका वाटप करावयाच्या असल्याने, अशा पात्र झोपडीधारकांच्या झोपड्या, नागपूर महानगरपालिका, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण व नागपूर सुधार प्रन्यास कार्यालयाद्वारे दिनांक ३० मे, २०१७ आणि दिनांक ३१ मे, २०१७ रोजी संयुक्तिक कार्यवाही करुन निष्कासीत करण्यात आल्या आहेत.
(२) झिंगाबाई टाकळी येथे आणखी ५२ अनधिकृत घरे असून, सध्या पावसाळा असल्याने, कार्यवाही स्थगित ठेवण्यात आलेली आहे.
(३) व (४) या ठिकाणी राहात असलेल्या पात्र लाभार्थ्यांचे मौजा झिंगाबाई टाकळी येथील खसरा क्र. २०५/१ येथे पुनर्वसन करण्याची प्रक्रिया सुरु आहे.

---

## आदिवासी क्षेत्रातील ५० टक्के आदिवासी विदयार्थी संख्या असलेल्या शाळांना अनुदान देण्याबाबत

**(३७) ३२९८२ (११-०८-२०१७). श्री.चंद्रकांत रघुवंशी : तारांकित प्रश्न क्रमांक २९००२ ला दिनांक २० मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) आदिवासी क्षेत्रातील ५० टक्के आदिवासी विदयार्थी संख्या असलेल्या १०१ शाळांना १०० टक्के अनुदान देण्याचे सन २०१४ मध्ये वा त्यादरम्यान शासन निर्णय होऊनही या शाळांना अनुदान देण्यात आले नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या आर्थिक वर्षात उक्त शाळांना अनुदान देण्यासाठी सुरु असलेली कार्यवाही पूर्ण झाली, त्याचे थोडक्यात स्वरुप काय आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (३१-१०-२०१७) :** (१) अंशत: खरे आहे. शासन निर्णय दिनांक १९ सप्टेंबर, २०१६ अन्वये दिनांक १४ जून, २०१६ पूर्वी अनुदानास पात्र घोषित करण्यात आलेल्या शाळांना सरसकट २० टक्के प्रमाणे अनुदान मंजूर करण्यात आले. तसेच दिनांक १ फेब्रुवारी, २०१७ च्या शासन

निर्णयान्वये पात्र शाळांना अनुदान वितरीत करण्यात आले आहे. यात आदिवासी उपयोजना क्षेत्रातील शाळांचा समावेश आहे.
(२) सदर शाळांना १०० टक्के अनुदान उपलब्ध करुन देण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही सुरु आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**महाराष्ट्र जीवन प्राधिकरण संयुक्त संघटनेच्या विविध मागण्यांबाबत**

**(३८) ३३३३२ (११-०८-२०१७). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **पाणीपुरवठा व स्वच्छता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण संयुक्त संघटना संघर्ष समितीने विविध मागण्यासाठी दिनांक १ मार्च, २०१७ रोजी वा त्यासुमारास आंदोलन केले होते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या महाराष्ट्र जीवन प्राधिकरण संयुक्त संघटनेच्या मागण्या कोणत्या आहेत,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. बबनराव लोणीकर (२३-१०-२०१७) :** (१) होय.
(२) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या कर्मचाऱ्यांचे वेतन, भत्ते व निवृत्तीवेतनाचे दायित्व महाराष्ट्र शासनाने स्विकारावे, अशी संयुक्त संघटनेने मागणी केली आहे.
(३) मा.मंत्रिमंडळाच्या मान्यतेने शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग दिनांक २३/०३/२०१७ नुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अधिकारी/ कर्मचारी यांचे वेतन, भत्ते व निवृत्तीवेनाचे दायित्व राज्य शासनाने स्वीकारले आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## उस्मानाबाद जिल्हयातून पुण्यात आलेले दोन टन गोमांस जप्त केल्याबाबत

**(३९) ३३४२६ (११-०८-२०१७). श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) उस्मानाबाद जिल्हयातून पुण्यात गोमांस विक्रीसाठी आणत असलेले टेम्पो गोरक्षकांनी सापळा रचून पकडल्याचे माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार सदर गोमांस विक्रीस आणणाऱ्यावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (११-१०-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) होय, याबाबत पोलीस स्टेशन कोरेगाव पार्क गु.र.क्र.७२/२०१७ अन्वये महाराष्ट्र प्राणी संरक्षण अधिनियम, १९९५ चे कलम ५ (अ)(ब)(क), ९ (अ) प्रमाणे गुन्हा दाखल करण्यात आला आहे. सदर गुन्ह्यामध्ये दोन आरोपींना अटक करण्यात आले असून ६०० किलो गोवंश सदृष्य मांस व एक टेंम्पो जप्त करण्यात आला आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कांचनवाडी, मुर्तीजापूर (जि.औरंगाबाद) येथील संपादित जमिनीचा मोबदला शेतकऱ्यांना देण्याबाबत

**(४०) ३३४३८ (११-०८-२०१७). श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कांचनवाडी, मुर्तीजापूर (जि.औरंगाबाद) येथील संपादित जमिनीचा मोबदला मिळाला नसल्याने शेतकऱ्यांनी मा.विधानसभा अध्यक्षांच्या घरासमोर आंदोलन केले असून विमान रोकोचा इशारा दिल्याचे माहे जून, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार शेतकऱ्यांच्या जमिनीचा मोबदला देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (३०-१०-२०१७) :** (१) अंशत: खरे आहे.
(२) प्रस्तुत विषयाच्या अनुषंगाने मा.विधानसभा अध्यक्षांनी मा.मुख्यमंत्री महोदयांच्या उपस्थितीत सर्व सबंधित अधिकाऱ्यांची बैठक घेऊन जमिनीच्या मोबदल्यासंदर्भात मंत्रिमंडळासमोर प्रस्ताव सादर करण्याचे निदेश दिले आहेत. त्यानुसार सामान्य प्रशासन विभाग (विमानचालन) कडून मंत्रिमंडळ टिप्पणीवर सर्व सबंधित विभागांचे अभिप्राय मागविण्यात आले असून अभिप्राय प्राप्त झाल्यानंतर त्याप्रमाणे मंत्रिमंडळासमोर विभागाकडून प्रस्ताव सादर करण्याची कार्यवाही करण्यात येईल.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**राज्यात अनुदानास पात्र शाळा, वर्ग व तुकड्यांना अनुदानाचा वाढीव टप्पा देण्याबाबत**

**(४१) ३३४९२ (११-०८-२०१७). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे : तारांकित प्रश्न क्रमांक २७३६० ला दिनांक १ एप्रिल, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) शालेय शिक्षण विभागाच्या दिनांक १९ सप्टेंबर, २०१६ च्या शासन आदेशाने राज्यातील २४५२ तुकड्या व १६२८ शाळा यांना दिनांक १ सप्टेंबर, २०१६ पासून २० टक्के अनुदान देण्यात येत आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त शाळांना पुढील अनुदानाचा वाढीव टप्पा देणे क्रमप्राप्त असल्याने सदर शाळांना अनुदानाचा सुधारित वाढीव टप्पा देण्याबाबत लेखी निवेदने लोकप्रतिनिधींनी शासनास दिली आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर शाळा, वर्ग व तुकड्यांना अनुदानाचा वाढीव टप्पा देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (३१-१०-२०१७) :** (१) होय.
(२) निवेदने प्राप्त झालेली आहेत.
(३) शासन निर्णय, दिनांक १९ सप्टेंबर, २०१६ अन्वये अनुदान सूत्रामध्ये सुधारणा करुन, शासनाच्या पुढील आदेशापर्यंत सरसकट २० टक्के प्रमाणे अनुदान सूत्र विहित करण्यात आले आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील अनुदानित शाळांना वेतनेतर अनुदान मिळण्याबाबत

**(४२) ३३४९३ (११-०८-२०१७). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील दिनांक ३१ मार्च, २००८ पर्यंत १०० टक्के अनुदानावर आलेल्या शाळांना वेतनेतर अनुदान दिले जात आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, अनुदानित शाळांची सन २०१७ या आर्थिक वर्षातील वेतनेतर अनुदानाची तरतूद करण्यात आली असून सोलापूर, कोल्हापूर, सांगली, पुणे, सातारा जिल्ह्यातील शाळांच्या खात्यावर अनुदानाची तरतूद असूनही आजपर्यंत सदरहू शाळांना वेतनेतर अनुदान जमा करण्यात आले नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (३१-१०-२०१७) :** (१) होय.
(२) नाही. शासन निर्णय दिनांक १९ जानेवारी, २०१३ मधील अटी व शर्तीची पूर्तता करण्यात आलेल्या शाळांना वेतनेतर अनुदान उपलब्ध करुन देण्यात आले आहे.
(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**मौजे विंग (ता.खंडाळा, जि.सातारा) येथील तहसिल कार्यालयातील मंडळ अधिकारी शिरवळ यांनी फेरफार चुकीच्या पध्दतीने केल्याबाबत**

**(४३) ३३६३२ (०७-०८-२०१७). श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मौजे विंग (ता.खंडाळा, जि.सातारा) येथील तहसिल कार्यालयातील मंडळ अधिकारी शिरवळ यांनी फेरफार क्र.९४४ चुकीच्या पध्दतीने तयार करुन मयत व्यक्तीच्या नावे फेरफार केल्याबाबत दिनांक २९ नोव्हेंबर, २०१६ रोजी वा त्यासुमारास सामाजिक कार्यकर्त्यांनी मुख्य सचिव यांच्याकडे लेखी तक्रार केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (२७-१०-२०१७) :** (१), (२) व (३) सामाजिक कार्यकर्ते श्री. दरबारसिंग जगन्नाथ साळुंखे यांनी मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांच्याकडे दिनांक २९ नोव्हेंबर, २०१६ रोजी दिलेला लेखी तक्रार अर्ज जिल्हाधिकारी, सातारा यांचेकडून उपविभागीय अधिकारी, वाई यांचेकडे चौकशीसाठी पाठविण्यात आला होता. या प्रकरणी खरेदी देणारांच्या वारसांनी महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम, १९६६ चे कलम २४७ प्रमाणे दाखल अपिलावर उपविभागीय अधिकारी, फलटण यांनी सुनावणी घेऊन अपिलार्थी यांनी अपिलात घेतलेल्या हरकती या दिवाणी स्वरुपाच्या असल्याने फेरफार क्र. ९४४ बाबत मंडळ अधिकारी शिरवळ यांनी घेतलेला निर्णय कायम असल्याबाबतचे आदेश दिनांक १७/०७/२०१७ रोजी पारीत केले आहेत.

---

**बीड नगरपालिकेच्या मलेरिया विभागातील अपुऱ्या कर्मचाऱ्यांबाबत**

**(४४) ३३९३२ (११-०८-२०१७). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) बीड नगरपालिकेच्या मलेरिया विभागातील अपुऱ्या कर्मचाऱ्यांमुळे शहरात डास निर्मुलन धुर फवारणी होत नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, नगरपालिकेत मलेरिया कर्मचाऱ्यांची संख्या कमी आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, शहराच्या लोकसंख्येच्या तुलनेत नगरपालिकेला मलेरिया विभागात किती कर्मचाऱ्यांची आवश्यकता आहे,
(४) असल्यास, मलेरिया विभागातील कर्मचारी भरतीबाबत शासनाकडे प्रस्ताव आला आहे काय,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२४-१०-२०१७) :** (१) हे खरे नाही.
(२), (३) व (४) मंजूर आकृती बंधानुसार कर्मचारी संख्या पुरेशी आहे. तथापि रिक्त पदांच्या भरतीचा प्रस्ताव मुख्याधिकारी, बीड नगरपालिका यांनी सहसंचालक, आरोग्य सेवा, पुणे यांच्याकडे सादर केला आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

**अकोला शहरातील हद्दवाढ भागात मुलभूत सुविधा पुरविणेबाबत**

**(४५) ३४०११ (११-०८-२०१७). श्री.गोपिकिशन बाजोरीया :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अकोला शहराची नुकतीच हद्दवाढ होऊन १०० किलोमीटरचा परिसर शहरामध्ये समाविष्ट करण्यात आला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, अकोला शहरातील हद्दवाढ होण्यापूर्वीचा भाग व होण्यानंतरचा भाग यामध्ये मुलभूत सुविधा व पाणीपुरवठा तसेच इतर कामांकरिता शासनाच्या भरीव निधीची आवश्यकता आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१३-१०-२०१७) :** (१) होय,
दिनांक १७ मार्च, २०१६ च्या अधिसुचने नुसार अकोला शहराची हद्दवाढ करण्यात आली आहे.
(२) होय.
(३) हद्दवाढ झालेल्या महानगरपालिकांना नव्याने समाविष्ट क्षेत्रात नागरी सुविधा पुरविण्यासाठी सहाय्य या योजनेंतर्गत दिनांक २७ जून, २०१२ च्या शासन निर्णयानुसार अनुदान वितरण करण्यात येते. त्या अनुषंगाने कार्यवाही शासनस्तरावर सुरु आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यातील अंशकालीन निदेशकांचे धोरण निश्चित करणेबाबत**

**(४६) ३४०८९ (१८-०८-२०१७). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **कौशल्य विकास व उद्योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील अंशकालीन निदेशकांबाबतीत धोरण निश्चित करणे संदर्भात मा.उच्च न्यायालयाच्या खंडपिठाने दिनांक ६ जून, २०१७ रोजी वा त्यासुमारास आदेश दिले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, मा.न्यायालयाच्या आदेशाची दखल घेवून अंशकालीन निदेशकांच्या संदर्भात धोरण निश्चित करण्याकरिता शासन सकारात्मक भूमिका घेणार आहे काय,
(३) असल्यास, शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांतील अंशकालीन निदेशकांना मागील काही महिन्यांपासून वेतन अदा झाले नाही, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, कौशल्य विकास शिक्षणाला केंद्र व राज्य शासनाने अनन्य साधारण महत्व दिले असताना निदेशकांचे वेतन थांबवून त्यात व्यत्यय आणल्याबद्दल शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, तसेच सदर निदेशकांचे वेतन शासन किती दिवसात अदा करणार आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. संभाजी पाटील-निलंगेकर (२६-१०-२०१७) :** (१) हे खरे नाही.

राज्यातील औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये शिल्पनिदेशक, गटनिदेशक, चित्रकला निदेशक, गणित निदेशक, गणित व चित्रकला निदेशक ही पदे मंजूर आहेत. परंतू अंशकालीन निदेशक हे पद औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये मंजूर नाही.
(२), (३), (४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

**यवतमाळ जिल्हयातील तरुणांमध्ये बेरोजगारीचे प्रमाण वाढत असल्याबाबत**

**(४७) ३४१३६ (११-०८-२०१७). श्री.सुभाष झांबड :** सन्माननीय **कौशल्य विकास व उद्योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) यवतमाळ जिल्हयातील तरुणांमध्ये बेरोजगारीचे प्रमाण वाढत असल्याची बाब निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सुशिक्षित तरुणांना रोजगाराच्या संधी उपलब्ध होत नसल्याने त्यांच्यात नैराश्याचे प्रमाण वाढत चालले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, जिल्हयातील सुशिक्षित तरुणांची आकडेवारी व रोजगार यातील तफावत दिवसेंदिवस वाढत चालली आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. संभाजी पाटील-निलंगेकर (१३-१०-२०१७) :** (१) यवतमाळ जिल्हयातील तरुणांमध्ये बेरोजगारीचे प्रमाण वाढत असल्याबाबत कोणतेही निवेदन/तक्रार या संचालनालयास तसेच जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उदयोजकता मार्गदर्शन केंद्र यवतमाळ कार्यालयास प्राप्त झालेली नाही. जिल्हा कौशल्य विकास रोजगार व उदयोजकता मार्गदर्शन केंद्र, यवतमाळ या कार्यालयाची गेल्या ३ वर्षाची उमेदवारांची नांव नोंदणी नोंदणीपट तथा नोकरीस लागलेल्या उमेदवारांचा तपशिल खालील प्रमाणे आहे.

| **वर्ष** | **नांव नोंदणी** | **नोंदणीपट** | **नोकरीस लागलेले उमेदवार** |
|---|---|---|---|
| २०१४ | १०५०१ | ८९२५५ | ५६२ |
| २०१५ | ६४६८ | ८१६०२ | १८१७ |
| २०१६ | ७३१५ | ८०७९० | १५७४ |
| २०१७ (जुलै २०१७ अखेर) | ३२७३ | ८४०३२ | १४० |

(२) प्रश्न उद्भवत नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

**बांभोरी (जि.जळगाव) येथील तरुणीच्या आत्महत्येबाबत**

**(४८) ३४२२३ (११-०८-२०१७). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) बांभोरी (जि.जळगाव) येथील त्रिमुर्ती तंत्रनिकेतन महाविद्यालयात डिप्लोमाच्या दुसऱ्या वर्षात असणाऱ्या मयुरी सुरेशचंद्र पवार या तरुणीचा काही महिन्यांपूर्वी ऑर्डनन्स फॅक्टरीच्या दिलेल्या परिक्षेचा ऑनलाईन निकाल जाहिर झाल्याने तो घेण्यासाठी घराबाहेर पडली असता तिचा मृतदेह तलावात तरंगताना दिनांक ५ जून, २०१७ रोजी वा त्यासुमारास आढळून आला, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त तरुणीचा मृत्यू पाण्यात बुडून झाल्याचा अहवाल डॉक्टरांनी दिला असतानाही सदर घटनेत आत्महत्या झाल्याचा संशय निर्माण झाला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणाची पोलीस स्टेशनमध्ये नोंद करण्यात आली आहे काय, तसेच आत्महत्या कोणत्या कारणामुळे करण्यात आली याचा पोलीस तपास करीत आहेत काय,

(४) असल्यास, तपासाअंती दोषीवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२५-१०-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) तिचे मृत्यू संदर्भात आत्महत्या झाल्याचा संशय निर्माण झाला हे खरे नाही.

(३) व (४) सदर घटनेबाबत एमआयडीसी पोलीस स्टेशन, जळगांव येथे अ.मृ.रजि.नं. ५८/२०१७, क्रि.प्रो.को. कलम १७४ नुसार अकस्मात मृत्यूची नोंद करण्यात आली आहे. सदर अकस्मात मृत्यूची चौकशी सुरु आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## बीड शहरातील पुलाच्या दुर्दशेबाबत

**(४९) ३४५०४ (११-०८-२०१७). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) बीड शहर व पेठ बीड (जि.बीड) भागाला जोडणाऱ्या नव्या पुलाची दुर्दशा झाली असून तो वाहतुकीसाठी धोक्याचा बनला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या पुलाच्या बाबतीत बीड नगरपालिकेने शासनाकडे प्रस्ताव अथवा अहवाल पाठवला आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (०३-१०-२०१७)** : (१) हे खरे नाही.
(२), (३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**बीड नगरपालिकेतील रोजंदारी सफाई कामगारांना सेवेत सामावून घेणेबाबत**

**(५०) ३४५०५ (११-०८-२०१७). श्री.विनायकराव मेटे** : सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) बीड नगरपालिकेतील रोजंदारी सफाई कामगारांनी कायम सेवेत सामावून घ्यावे या मागणीसाठी दिनांक १९ जून, २०१७ रोजी पासून जिल्हाधिकारी कार्यालयासमोर थाळीनाद आंदोलन सुरू केले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या आंदोलनाची दखल शासनाने घेतली आहे काय,
(३) असल्यास, या रोजंदारी सफाई कामगारांची मागण्यांबाबत शासन सकारात्मक भूमिका घेणार आहे काय,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (०३-१०-२०१७)** : (१) नाही.
(२), (३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**विधान भवन :**
**नागपूर.**

**डॉ. अनंत कळसे**
**प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

---

मुद्रणपूर्व सर्व प्रकिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मुद्रणालय, नागपूर